वीणा प्रकाशन—१९

# धूर

व

# इतर एकांकिका

अनंत काणेकर




२८ डिसेंबर १९४१.

किंमत १॥ रुपया.

प्रकाशक—
ब. गो. गर्गे, एम्. ए.
वीणा प्रकाशन
सीताबर्डी, नागपूर.

संपादक—
ब. गो. गर्गे, एम्. ए.
द्वा. वा. घाटे
बी. ए. एल्.एल्. बी







मुद्रक—
ल. म. पटले,
रामेश्वर प्रिंटिंग प्रेस, सिताबर्डी, नागपूर.

'धूर व इतर एकांकिका' या संग्रहांतील 'सैपाकणी' 'धूर' 'श्री शिवाजी शहाजी भोसले,' 'पैजार' आणि 'बांदिवलींत डॉक्टर' या एकांकिका स्वतंत्र आहेत; 'बांदिवलींतल्या मास्तरणी' 'आत्महत्या' 'संप' या रूपांतरीत आणि 'डिक्टेटर' ही भाषांतरीत आहे. 'बांदिवलींतल्या मास्तरणी'-मधील पात्रें घेऊन 'बांदिवलींत डॉक्टर' ही स्वतंत्र एकांकिका लिहिली आहे. गॉल्सवर्दीच्या 'स्ट्राईफ्' या नाटकांतील 'संप' हा एक प्रवेश आहे. 'डिक्टेटर' ही एकांकिका पहिल्यांदा प्रसिद्ध केली तेव्हां तिला परिचयाचे पुढील चार शब्द जोडले होते.

'स्टीफन् व्हिन्सेन्ट बेने यांच्या मूळ लघुकथेवरून पर्सीव्हल् वाईल्ड् यांनीं हें नाटक तयार केलें आहे. बेने यांचा उद्देश अमुकच देशांतल्या हुकूमशाहीचें चित्र काढण्याचा नाहीं. कुठल्याही देशांत हुकूमशाही झाली कीं त्या देशांतल्या बुद्धिवंतांची किती केविलवाणी दुर्दशा होते याचें विदारक दृश्य मूळ लघुकथेंत आणि तिच्यावर आधारलेल्या या एकांकिकेत आहे. नाटकाचें नांव Blood of the Martyrs असें आहे मराठींत 'डिक्टेटर' असें सुटसुटीत नांव दिलें आहे.'

या संग्रहाला जोडलेला 'एकांकिका,–इतिहास आणि तंत्र' हा प्रास्ताविक निबंध अनेक वाङ्मयांतील एकांकिकांचा सूक्ष्म अभ्यास केलेल्या माझ्या एका विद्वान् स्नेह्यांनीं लिहिला आहे. त्याकरतां आवश्यक असलेलीं पुस्तकें आणि माहिती माझे मित्र श्री. दि. वि. आमोणकर यानीं अत्यंत परिश्रमपूर्वक एकत्र करून मला दिली. माझ्या स्नेह्यांची आपलें नांव देण्याची इच्छा नाहीं; तरी पण त्यांच्या व श्री. आमोणकर यांच्या अकृत्रिम स्नेहभावाबद्दल मी अत्यंत कृतज्ञ आहे.

अनंत काणेकर.

# ' काणेकर साहित्य '



१ चांद्रात
२ शिंपले आणि मोती
३ पिकलीं पानें
४ जागल्या छाया
५ तुटलेले तारे
६ निशिकांताची नवरी
७ मोरपिसें
८ धुक्यांतून लाल ताऱ्याकडे
९ दिव्यावरती अंधेर
१० रात्रेंतील निखारे
११ घरकुल
१२ धूर ( व इतर एकांकिका )

## आगामी

१३ उघड्या खिडक्या
१४ हिरवे कंदील
१५ ' रसेल ' नीति



# एकांकिका

## ( इतिहास आणि तंत्र )

### ( १ )

एकांकिका ह्या नाट्यप्रकाराचें पुनरुज्जीवन विशेष कसोशीनें जरी गेल्या तीस चाळीस वर्षांत व विशेषतः पहिल्या जागतिक युद्धानंतरच झालें असलें तरी एकांकिका आधुनिक नाट्यवाङ्मयाएवढीच जुनी आहे; किंबहुना आजच्या 'पूर्णकृती' नाटकाचा पाया एकांकिकेनेच घातला असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. बहुतेक ग्रीक नाटकें एकांकिकाच आहेत; त्याचप्रमाणे मध्ययुगीन युरोपांत जीं धार्मिक नाटकें निर्माण झालीं, व ज्यांना "मिरॅकल्" "मिस्टरीज" व "मोरॅलिटीज" या नांवांनीं संबोधिलें जातें तीं सारी एकांकिक नाटकें होतीं. हीं धार्मिक नाटकें कालांतराने चर्चच्या आवारांतून व्यावहारिक जगाच्या रंगभूमीवर ( हा शद्ब या ठिकाणीं अगदी सामान्य अर्थी म्हणजे ज्या ठिकाणीं नाटक केलें जाते ती रंगभूमी या अर्थानें योजिलेला आहे. ) आल्यावर ह्या धार्मिक नाटकांस नव्या व्यावहारिक नाट्यप्रकाराची जोड देण्यांत आली; त्यांना "इन्टरल्यूड" हें नांव देण्यांत आलें. हीं बहुधा प्रहसनवजा असत व आजच्या एकांकिकेचा अव्वल पूर्वज या नात्यानें त्यांचा निर्देश करावयास हरकत नाहीं. परंतु सोळाव्या शतकांत नाट्यवाङ्मयाचा जो प्रचंड विस्तार पाश्चात्य देशांत झाला, त्यावेळीं एकांकिका मागे पडून "पूर्णकृती" नाटकेंच उदयास आलीं. सामान्यतः संपन्न व सुसंस्कृत समाजांत नाट्यवाङ्मयाची अभिरुची "पूर्णकृती" नाटकाकडे ज्यास्त झुकते. तीन ते पांच अंकी नाटकें अधिक करमणूक देत असतात व यामुळें शान्ततेच्या, सुबत्तेच्या व फुरसदीच्या कालांत अशाच नाटकांची रंगभूमीवर चलती असते. अशा काळीं धंदेवाईक नाटक मंडळ्या व धंदेवाईक नाटककार उदयास येतात व अर्थदायक नाट्यवाङ्मयच त्यांच्याकडून संवर्धिलें जातें. चार ते पांच तास प्रेक्षकांची करमणूक करण्यास एक 'पूर्णकृती' नाटक जेवढें फायदेशीर ठरतें तेवढ्या प्रमाणांत चार पांच एकांकिका ठरत नाहींत. या विधानास नोएल कॉवर्डच्या कांहीं एकांकिका अपवादात्मक ठरतील; कारण त्याच्या तीन चार एकांकिका एका 'पूर्णकृती' नाटकाच्या ऐवजी करून उत्पन्नाचा आंकडा

घटत नाहीं असा अनुभव आलेला आहे. तथापि हा अनुभव सर्वसामान्य आहे असें म्हणतां येत नाहीं. यामुळेंच धंदेवाईक नाटक कंपन्यांच्या काळांत एकांकिका मागें पडली; व तिचा उद्धार रंगभूमीवर पुनश्च करण्याचा काळ शेवटीं विसाव्या शतकांत आला. याला कारण मुख्यतः सिनेमाची स्पर्धा होय. रंगभूमीला ही सिनेमाची स्पर्धा पाश्चात्य देशांत या शतकाच्या आरंभी भासूं लागली. त्याचप्रमाणें लांब नाटकें चारपांच तास थियेटरांत बसून पहाण्याएवढा दीर्घ कालावधी करमणुकीसाठीं घालविण्याची आजच्या विसाव्या शतकांतील माणसाची प्रवृत्ती कमीच !! ज्या कारणामुळें लघुकथा, व लघुनिबंध विसाव्या शतकांत विशेष प्रचारांत आले त्याच कारणामुळें या गडबडीच्या धांदलीच्या काळांत, थोड्या फार फरकानें लघुनाटकें जनरंजनार्थ निर्माण झालीं. प्रथम एकोणीसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत इंग्लडांत रंगभूमीचें बऱ्याच कालानंतर जें जोरदार पुनरुज्जीवन झालें त्याकाळीं एखाद्या पूर्णकृती नाटकाच्या आरंभीं एक लहानसें नाटक करण्याचा प्रघात अस्तित्वांत आला. त्यांना Curtain-raisers असें अन्वर्थक नांव देण्यांत आलें. बॅरीची The Twelve Pound Look आणि शॉची How He Lied to Her Husband ह्या दोन्हीं एकांकिका मोठ्या नाटकाच्या आधी थियेटरांत लौकर येणाऱ्या प्रेक्षकांचें रंजन करण्यासाठींच लिहिल्या होत्या. अशा प्रकारें एकांकिक नाटकाचें पुनरुज्जीवन झालें, तथापि त्यांना स्वतंत्र नवजीवन गेल्या लढाईनंतरच मिळालें. याला अनेक सामाजिक व राजकीय कारणें असलीं तरी मुख्यतः ज्याला " लिट्ल् थियेटर " चळवळ म्हणतात तीच कारणीभूत झाली. तिला चालना देण्याचें बरेंच मोठें श्रेय १९२६ सालीं इतर सर्व नाटक समित्यांस आपल्या उदरांत समाविष्ट करून घेणारी " ब्रिटीश ड्रामा लीग् " या संस्थेस दिलें पाहिजे. अनेक हौशी नट व नाटककार यांना रंगभूमीवर आणण्याचें श्रेय याच चळवळीस देण्यांत येतें. आज इंग्लंडांत सुमारें एक लाख हौशी नट व सुमारें वीस ते तीस हजार हौशी ( Amateur ) नाटक समित्या आहेत. या समित्या आपआपल्या गांवी लहान थियेटर बांधून फावल्यावेळांत नटाचें काम करणाऱ्या स्त्रीपुरुषास नाटकांत काम देऊन नाट्यकलेला उत्तेजन देण्याचें कार्य करीत असतात. या त्यांच्या प्रयत्नास भरपूर उत्तेजन ड्रामा लीगकडून मिळत असतें. दरवर्षीं एका मोठ्या नाट्य-उत्सव प्रसंगीं ( Dramatic festvial ) या सर्व प्रांतिक हौशी नाट्यमंडळांस चढा-

ओढींत भाग घेतां येतो. प्रत्येक घटक एक चाळीस मिनिटें चालणारें नाटक करून दाखवितो, व त्यांतील उत्कृष्ट ठरणाऱ्या नाटकास बक्षीस देण्यांत येतें. १९२७ सालीं एकशें पन्नास नाट्यसमित्यानीं या चढाओढींत भाग घेतला, तर १९३६ सालीं सातशें सत्तेचाळीस समित्यानीं भाग घेतला. यावरून या चढा-ओढांची लोकप्रियता व हौशी नाट्यमंडळांची गेल्या दहा पंधरा वर्षांत इंग्लंडांत झालेली वाढ लक्षांत येते. या सर्व प्रांतिक नाट्यमंडळासाठीं योग्य त्या एकांकिका तयार करण्याकरतां नाटककारांकडे सारखी मागणी असतें. १९३६ सालीं तीनशेंच्या वर नवीं एकांकिक नाटकें एकट्या इंग्लंडमध्येच प्रसिद्ध झालीं आहेत; यावरून या ' लिट्ल् थियेटर ' चळवळीचा एकांकिकांच्या वाढीवर किती परिणाम झाला आहे हें लक्षांत येण्यासारखें आहे. हा सर्व इतिहास या ठिकाणीं सांगण्याचें कारण अर्थांतच उघड आहे. या इतिहासाचा वृत्तान्त मराठी नाट्यवाङ्मयाच्या वाढीस कितपत फायदेशीर होईल हें तज्ज्ञांनीं विचारांत घेण्यांसारखें आहे.

## ( २ )

एकांकिका ही नाट्यवाङ्मयाची एक शाखा असल्यामुळें थोड्या फार फरकानें नाटकाचे सामान्य नियम एकांकिकेस लागू पडत असतात. कोणत्याहि कलेचे सामान्य नियम त्या कलेच्या जोपासनेस व वर्धनास पोषकच असतात, कारण कोणत्याहि कलेचें तंत्र ती अस्तित्वांत आल्यानंतरच अनेक यशस्वी उदाहरणा-वरून निष्कर्षण पद्धतीनें तयार केलेले असतें. यामुळें हे नियम स्वाभाविकच बन्धनकारक नसून विकासक्षमच आहेत हें तत्व प्रत्येक व्यावसायिक टीकाकारानें ध्यानात घ्यावयाचें असतें. परंतु त्याबरोबरच वाङ्मय-टीकाकारानें हे नियम सर्व-मान्य सर्वकालिक आहेत असा दृढ समज करून घेतां नये ! कलेचा कोणताहि नियम कालाबाधित नसतो, व तो तसा नसणेंच योग्य आहे. कोणत्याहि कलेची वाढ त्या कलेच्या नियामक तत्वांच्या मार्गानें होत असतां त्या तत्वांना नवी मुरड मिळत असते; यामुळें कोणत्याहि कलेची मौलिक किंमत ठरविताना त्या कलेची नियामक तत्वें हा मुख्य निकष मानला तरी, तें एकमेव परिमाण आहे असें मानणें कधीहि योग्य होणार नाहीं. त्याचप्रमाणें कलेचें वर्गीकरण सामान्य अभ्यासाच्या दृष्टीनें योग्य असलें तरी तें सर्वपरिपूर्ण आहे असें मानणें योग्य होणार नाहीं. कोणत्याहि कलेचा असा कोणताहि नियम नाहीं कीं जो मोठ्या

कलावन्तानीं यशस्वी रीतीनें मोडलेला नाहीं. यामुळें कोणत्याहि कलेचें तंत्र हें त्या कलेच्या अभ्यासकाऱ्या दृष्टीनें योग्य असलें तरी, तें त्रिकालाबधित आहे किंवा अनुल्लंघनीय आहे असें मानणें योग्य होणार नाहीं. ॲरिस्टॉटल्नें घालून दिलेलीं कोणतींही नियामक तत्वें नाट्यवाङ्मयाच्या वाढीच्या इतिहासांत अबाधित ठरलेलीं नाहींत. त्यानें घातलेलीं स्थलकालाचीं बंधनें प्रत्येक मोठ्या नाट्यकारानें मोडलेलीं आहेत. ॲरिस्टॉटल्च्या मतें नाटकाच्या संविधानकाचा काल फार तर एक दिवसाचा असावा ( Single revolution of the sun ) परंतु शेक्स्पीयरनें हा नियम अनेकदां धाब्यावर बसविला आहे. त्याच्या पसतीस नाटकांत " टेंपेस्ट " सोडल्यास एकाहि नाटकांत हा कालाचा नियम पाळलेला नाहीं. ' विन्टर्स् टेल्'मध्यें तर पहिल्या अंकांत जन्मास न आलेली मुलगी शेवटच्या अंकांत नवयौवना बनून रंगभूमीवर प्रवेश करते. हीच कथा इतर सर्व नाटककारांची आहे असें सामान्य विधान करावयास हरकत नाहीं. आरनोल्ड बेनेट् व नॉब्लॉक् यांच्या " माईलस्टोन्स् " या नाटकाच्या तीन अंकांत एकोणीसाव्या शतकांतील प्रगमनशील इंग्लिश समाजाच्या तीन पिढ्यांच्या आचारविचारांची परिणती चित्रित केलेली आहे. जी कथा ॲरिस्टॉटल्च्या कालबंधनाची, तीच कथा स्थलबंधनाची बऱ्याच प्रमाणांत आहे. परंतु कालबंधन जेवढ्या सौकर्यानें झुगारून देता येते तेवढ्या सुलभतेनें स्थलबंधन रंगभूमीसाठीं लिहिलेल्या नाटकांत देता येत नाहीं याचें कारण उघडच आहे. स्थलदर्शक रंगभूमीची सजावट प्रवेशामागून प्रवेशांत द्रुत गतीने बदलणें जवळ जवळ अशक्य असतें. तरी देखील कांहीं नाटककार, विशेषतः सोळाव्या व सतराव्या शतकांतील पाश्चात्य नाटककार, शक्य तेवढें स्वातंत्र्य याबाबतींतहि घेतात. व त्यांना तसे करणें एका अर्थी सुलभ होतें कारण रंगभूमीची सजावट सोळाव्या शतकांत अगदीं सामान्य प्रतीचीच होती; त्या रंगभूमीचा उल्लेख यामुळेंच " प्लॅटफॉर्म स्टेज् " या नावानेंच करण्यांत येतो. ' मरचंट ऑफ व्हेनीस्'मध्यें बेलमॉन्ट व व्हेनीस या दोन स्थळांमध्यें पात्रें वावरत असतात. अशा प्रकारें ॲरिस्टॉटल्चे नाट्यविषयक मुख्य दण्डक शेक्स्पीयर सारख्या नामवंत नाटककारानें मोडून आपलीं नाटकें अमर केलेलीं आहेत. याचा अर्थ ॲरिस्टॉटल्ची नियामक बुद्धी कमकुवत होती असा मुळीच नसून, वाङ्मयविकासाची अदम्य शक्ती कोणत्याहि नियामकाच्या पुढें जात असतें, असेंच मानलें पाहिजे. ॲरिस्टॉटलनें आपले नियम ग्रीक नाटक-

कारांचें वाङ्मय वाचून बनविले; परंतु ज्या रंगभूमीसाठीं व ज्या प्रेक्षकांसाठीं त्यांनीं नाटकें लिहिलीं ती ग्रीक रंगभूमी व ते प्रेक्षक नष्ट होतांच नव्या रंगभूमी-साठीं नव्या पद्धतीचीं नाटकें जन्मास येणें स्वाभाविकच होतें. वीस पंचवीस हजार प्रेक्षकांच्या समुदायासमोर उघड्या रंगभूमीवर (Open-air theatre) ग्रीक नाटककारांस आपलीं नाटकें करावयाचीं असत; व यामुळेंच त्या परिस्थितीस योग्य अशीच ग्रीक नाटककारांनीं आपल्या नाटकांची रचना केली. त्या नाटकां-वर आधारलेले ॲरिस्टॉटल्चे नियम त्रिकालाबाधित आहेत असें मानणें कधींच योग्य होणार नाहीं. ॲरिस्टॉटल् आजच्या काळांत जन्माला आला असता तर त्यानें आपले नियम खात्रीनें बदलले असते !

कोणत्याहि कलेची कसोटी त्या कलेच्या नियामक तत्वानीं मोजतानां हीच गोष्ट प्रत्येक टीकाकारानें ध्यानांत घ्यावयाची असते. याचा अर्थ नियामक तत्वांची अगर मंत्राची आवश्यकताच नाहीं, असा मात्र नाहीं. याबाबतींत एका अनुभविक डॉक्टरनें एका नवशिक्या समव्यावसायिकास केलेला उपदेश ध्यानांत घेण्या-सारखा आहे. तो आपल्या तरुण व्यावसायिकास एका केसच्या कन्सल्टींग संबधानें बोलतानां म्हणाला, " बाबा रे, वैद्यकीय पुस्तकांतील तत्वें खरीं नाहींत असें माझें मुळींच म्हणणें नाहीं, पण तीं तत्वें व्यक्तिशः प्रत्येक ' केसच्या ' परि-स्थितीनुसार थोड्या फार प्रमाणांत बदलावी लागतात. शिवाय औषधांचे ठराविक डोसीस् आपल्या देशाच्या हवापाण्यानुसार, खाण्यापिण्यानुसार इतकेंच काय पण मनोभूमिकेनुसार बदलावे लागतात, व याच कामीं आम्हीं आमचा अनुभव वापरावयाचा असतो. " हें विधान इतर सर्व तात्विक चर्चेस पूर्णपणें लागू आहे !!

( ३ )

वर म्हटल्याप्रमाणें एकांकिका ही नाट्यवाङ्मयाची एक शाखा असल्यामुळें नाट्यवाङ्मयास लागू असणारे सारे सामान्य दण्डक एकांकिकेसहि लागू असतात. इतर वाङ्मयप्रकाराहून नाट्यवाङ्मय हें बऱ्याच प्रमाणांत वेगळें पडतें याचें कारण नाटक आणि रंगभूमी यांचा अखंड संबंध हेंच आहे. इतर सर्व वाङ्मय स्वयंपूर्ण असते, परंतु नाट्यवाङ्मय तसें असूंच शकत नाहीं. यामुळें स्वाभाविकच इतर सर्व वाङ्मयप्रकाराहून नाट्यवाङ्मय हें व्यक्तिनिरपेक्ष अगर दुसऱ्या शब्दांत सांगा-वयाचें झाल्यास वस्तुनिष्ठ (objective) असतें. नाटककाराची भूमिका साक्षे-

पानेच नाटकांत प्रत्यंतरीत झालेली असते. सर्व कलेचा तसें पाहिल्यास अंतिम उगम आत्मानुभवांतच असतो, यांत शंका नाहीं; परंतु या आत्मानुभवास शक्य तेवढें व्यक्तिनिरपेक्ष स्वरूप देणें नाटककारास भाग असतें. आयुष्याच्या व्यापक अनुभवांतून निरनिराळ्या व्यक्ति निर्माण करून त्यांना कल्पनेनें निर्माण केलेल्या वातावरणांत स्वतंत्रपणे वावरवून, तद्‌द्वारा जीवनाचें दृश्य चित्र रंगविणें त्याला भाग असतें. प्रत्येक पात्र त्याच्या कल्पनेबरहुकूम काम करीत असतें, त्यांच्या मनोभूमिका देखील नाटककारच ठरवित असतो, परंतु हें सर्व काम त्याला आत्मप्रकटीकरण न करतां साधावयाचें असतें. हें कार्य त्याला जेवढ्या प्रमाणांत करतां येईल तेवढ्या प्रमाणांत तो अधिक यशस्वी नाटककार होईल यांत कांहीं शंका नाहीं. कादंबरींतील पात्रें कांहीं अंशीं लेखकाशीं समरस होतात, तर नाटकांतील पात्रांशीं नाटककार समरस होत असतो. शेक्स्पीयरचा ' हॅमलेट ' शेक्स्पीयरहून भिन्न आहे, तथापि त्याच्या प्रकृती विकृतींत शेक्स्पीयरचा विशिष्ट अनुभव, व दृष्टीकोण समाविष्ट आहे यांत कांहीं शंका नाहीं.

व्यक्तिनिरपेक्षत्व हा नाट्यवाङ्मयाचा सामान्य धर्म निरपवाद एकांकिकेसहि लागू आहे. त्याचप्रमाणें रंगभूमीशी नाटकाचें असलेलें अखंड नातें सर्व प्रकारच्या नाट्यवाङ्मयास लागू आहेच. अर्थात् कांहीं नाटकें रंगभूमीवरून वाचनालयांत बैठक ठोकून बसतात, परंतु त्यांचें वाचन अगर अभ्यास रंगभूमी-निरपेक्ष असतो असें मुळींच नाहीं; कारण नाटकांचा वाचक जरूर ती पार्श्वभूमी आपल्या कल्पनेनें नाटक वाचते वेळीं डोळ्यासमोर आणीत असतो. यामुळेंच कादंबरीकथावाचनाहून नाटकवाचन मनावर ताण देणारें असतें. अर्थात् या बाबतींत आधुनिक नाटककार आपल्या नाटकांत (स्थल-काल-व्यक्ति-निदर्शक)भरपूर वर्णन स्टेज डायरेक्शन्‌च्या रूपानें देऊन नाट्यवाङ्मय वाचनास सुगम करतात. ही पद्धत एका अर्थी कादंबरीकथावाङ्मयाची नाट्यवाङ्मयास भासणारी स्पर्धाच दर्शवितें, यांत कांहीं शंका नाहीं. मात्र या संपूर्ण रंग-सूचनांचा मुळांत उपक्रम निराळ्याच दृष्टीनें अस्तित्वांत आला. आपल्या पात्राविषयींची, व वातावरणाची पूर्ण कल्पना देण्याच्या उद्देशानेंच आधुनिक नाटककारांनीं ह्या संपूर्ण रंगसूचना नाटकांत घालण्याचा प्रघात अमलांत आणला. नट व निर्माते ( Producers ) आपल्या मतानुसार नाटककाराची मूळ कृती बदलू शकतात असा अनुभव विशेषतः अठराव्या व एकोणीसाव्या शतकांत येऊं लागला. शेक्स्पीयरचा शायलॉक हा कारुण्य-

निदर्शक आहे कीं हास्यकारक आहे याची भवती न भवती अद्यापीही होत असते. कांहीं नामांकित नट शायलॉकच्या रूपानें शेक्स्पीयर यांस आपली ज्यूबद्दलची सहानुभूति व्यक्त करावयाची होती असें मानून त्याचें रंगभूमीवर करुण चित्र रेखाटतात, तर कांहीं नट, विशेषतः एकोणीसाव्या शतकापर्यंत, शायलॉकला हास्यास्पद दाखवून, ज्यूलोकांबद्दल सोळाव्या शतकांत इंग्लिश लोकांस वाटत असलेला तिरस्कार व्यक्त करतात. हॅम्लेटची भूमिका करतानां देखील असेच फरक करण्यांत येतात. पार्श्वभूमीच्या बाबतींतहि असाच फरक रंगभूमीवर नाटक आणणाऱ्या निर्मात्याच्या कल्पनानुसार पडतो. ह्या बेजबाबदारपणास आळा घालण्यांसाठीं या संपूर्ण रंगसूचना आधुनिक पाश्चात्य नाटकांत मुळांत घालण्यांत आल्या असल्या तरी त्यांचा खरा उपयोग सामान्य वाचकांस नाटकवाचन कादंबरीकथाप्रमाणें सुगम करण्याकडेच ज्यास्त झाला आहे. परंतु अशा रंगसूचनामुळें नाटक ' नाट्यहीन ' होणार नाहीं अशी काळजी घ्यावी लागतें. रंगसूचनांत पात्रांची आणि त्यांच्या परिस्थितीची माहिती दिल्यामुळें संभाषणाच्या द्वारें ती माहिती पुनश्च न दिल्यास रंगभूमीवर नाटक यशस्वी होणार नाहीं; कारण रंगसूचनांचा उपयोग नाटक वाचतेवेळीं होतो, नाटकाचा प्रत्यक्ष प्रयोग पहाते वेळीं, त्या सूचनाबरहुकूम रंगविलेलीं पात्रें व पार्श्वभूमी पूर्णतया आकलन व्हावयास, पात्रांच्या संभाषणांत योग्य त्या सूचक कल्पना आणि वर्णन घालावें लागतें. आणि ह्या सूचना संभाषणांत मोठ्या कौशल्यानें न घातल्यास नाटक वाचतांना पुनरुक्तिमुळें कंटाळवाणें होण्याचा ज्यास्त संभव असतो. हे दोष वगळण्यासाठीं प्रथम सर्व नाटक संभाषणरूपानें लिहून झाल्यावर नंतर योग्य स्थळीं रंगसूचना घालण्याची पद्धत कसलेले नाटककार अमलांत आणीत असतात.

नाटक आणि रंगभूमी यांचा अशा प्रकारें परस्पर संबंध असल्यामुळें नाटकाची रचना ही इतर कथात्मक वाङ्मयाहून अतिशय निराळी असते. पात्राच्या कृती व भाषण या एकमेव साधनाच्या योगानें नाटककारास आपली कथा निवेदन करावयाची असते. त्यास व्यक्तिशः पुढें येऊन कोणतेंही वर्णन करतां येत नाही. कथासंधान, स्वभावरेखन, व स्थलकालवर्णन हीं कथात्मक वाङ्मयाचीं सारीं अंगें त्याला मुख्यतः संभाषणाच्या योगें चित्रित करावयाचीं असतात; व हें सर्व साधावयास अवधिहि नियमित असतो. कोणतेंहि नाटक चार, फार तर पांच, तास रंगभूमीवर चालूं शकते. एवढ्या अवधीत नाटककारास आपला सारा कथान-

काचा पसारा आटपून घ्यावा लागतो. यामुळें नाटकांत कृती आणि संभाषण यावरच सारा भार असतो. कृती आणि संभाषणाच्या द्वारें साऱ्या कथेचा उठाव त्याला करावा लागतो; यामुळें साधनांचा मितव्यय हा नाटककाराचा मोठा गुण मानणें भाग पडते. सूचक, व प्रेरक कृती, व भाषणें; जलद पण स्वाभाविकपणे घडून येणाऱ्या प्रसंगाना कार्यकारण भावानें जखडविण्याचें कौशल्य; समर्पक पण चेतनात्मक भावनाविष्कार करण्याची हातोटी व शेवटीं प्रसगांची व पात्रांची योग्य नियोजना करून कथेचें आदि, मध्य, अन्त्य परिणामकारक रीतीनें साधण्याची हातोटी—हे सर्व गुण जेवढ्या प्रमाणांत नाटककारांत असतील तेवढ्या प्रमाणांत तो ज्यास्त यशस्वी ठरत असतो.

नाट्यरचना ही कोणत्याहि इतर वाङ्मयरचनेहून ज्यास्त कौशल्यपूर्ण असणें जरूर असते. रंगभूमीवर प्रयोग उठावदार होण्यासाठीं कथासूत्राचा उत्सुकताजनक विकास होणें जरूर असतें. सामान्यतः सर्व नाट्य-कथांचा आत्मा कोणत्याना कोणत्या तऱ्हेचें संघर्षणच असतें. दोन व्यक्ती, दोन समाज, अगर दोन राष्ट्रें, अगर व्यक्ति आणि समाज यांमधील सामान्य स्वरूपाची अगर असामान्य प्रकारची तेढ नाट्यकथानकाचा मुख्य कणा होय. ही तेढ ज्या स्वरूपाची असेल त्यावरून नाटक शोकपर्यवसायी होईल कीं आनंदपर्यवसायी होईल याची कल्पना करणें बहुधा शक्य असतें. बाह्य घटकांमधील तेढीच्या जोडीस पुष्कळदां मानसिक द्वंद्व--एकाच व्यक्तीच्या मनांत चाललेलें भावनाविचारांचें युद्ध ग्रथित करण्याची पुष्कळ नाटककारांची पद्धत आहे. व कधा कधीं उच्च दर्जाच्या नाटकांत हें मानसिक संघर्षणच जास्त उत्सुकताजनक व चेतनात्मक वाटत असतें. हॅम्लेट व त्याचा काका व आई या दोघांमधील संघर्षण हें हॅम्लेट नाटकांत जेवढें महत्वाचें आहे, त्याहूनहि हॅमलेटच्या मनांत चाललेलें भावना विचारांचें द्वंद्व ज्यास्त क्षोभक व प्रेरक होतें. गॉलस्वर्दीच्या ' स्ट्राईफ् ' या नाटकांत मजूर पक्षाचा पुढारी व भाण्डवलवाल्यांचा पुढारी यामधील प्रत्यक्ष द्वंद्वापेक्षां या दोघांच्या मनांत भावनाविकारांचें चाललेलें जें द्वंद्व नाटककार मोठ्या कौशल्यानें दाखवितो तेंच ज्यास्त मनोवेधक ठरतें. सारांश एवढाच की कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपाच्या संघर्षणावरच नाट्यकथानकाची उभारणी केलेली असते. सामान्यतः आनंदपर्यवसायी ( Comedy ) नाटकामध्यें हें संघर्षण अल्प व तडजोडीला अनुकूल अशा स्वरूपाचेंच असतें; यासाठीं पात्रांचा स्वभावपरिपोषहि

त्या धोरणानेंच करावा लागतो; परंतु दुःखपर्यवसायी ( Tragedy ) नाटकांत हें संघर्षण तडजोडीस विघातक स्वरूपाचें असतें अगर त्या तऱ्हेचें स्वरूप धारण करतें. बहुधा परिस्थिती आणि त्या परिस्थितींत कार्य करणारें महत्वाचें पात्र व त्याच्या स्वभावांतील कांहीं विशिष्ट गुण यांच्या संघर्षणावरच सामान्यतः ट्रॅजडीच्या कथानकाची उभारणी करण्यांत येतें. हें संघर्षण कॉमेडीमध्यें सामान्यतः अल्पजीवि स्वरूपाचें असतें. "एकच प्याला" या नाटकाच्या कथावस्तूची उभारणी सुधाकराचा अत्यंत मानी व हळवा स्वभाव व परिस्थिती यांच्या संघर्षणावर झालेली आहे. सुधाकर जर किंचित् तडजोडी-वृत्तीचा असता, व सिन्धू ही जर ज्यास्त व्यवहारपटू असती, किंवा सुधाकराचा मानी, हळवा हेकेखोर स्वभाव जर अस्थिर व अनुभवानें बदलणारा असता तर नाटकाचा अन्त निराळ्या स्वरूपाचा झाला असता. हॅम्लेटच्या जागीं ऑथेल्लो व ऑथेल्लोच्या जागीं हॅमलेट असता तर हीं दोन्हीं नाटकें निराळ्या तऱ्हेचीं झालीं असतीं दीर्घसूत्री व फाजील विचारी हॅमलेट उतावळ्या व अविचारी ऑथेल्लोच्या जागीं असता तर कदाचित् कालावधींत आयागोचें कपट उघडकीस येतें. त्याचप्रमाणें ऑथेल्लो हॅमलेटच्या जागीं असता तर एक घाव दोन तुकडे या न्यायानें त्यानें आपल्या चुलत्याचा मुडदा पाडून बारा माणसांची हत्या वाचविली असती ! ! या तऱ्हेची कल्पना धाडसाची असली तरी ती अगदींच अयोग्य ठरणार नाहीं ! परिस्थिती आणि मानवी स्वभाव यांच्या संघर्षणातून ट्रॅजेडी बहुधा निर्माण होते; तर सर्वसामान्य प्रकृती व व्यक्तिगत चंचल विकृती यांच्या अल्पकालिक द्वंद्वातून कॉमेडीची कथावस्तू निर्माण होत असते. भावबंधनांतील लतिका व प्रभाकर हीं दोन पात्रें व त्या दोघांमधील द्वंद्व अशाच स्वरूपाचें आहे. दोघांच्याहि स्वाभाविक मनोरचनेवर विकृतीचा नवा पापुद्रा चढतो, परंतु तो अनुभवाच्या व मनस्तापाच्या आचेनें वितळतांच, त्यांच्यामध्यें उत्पन्न झालेली आत्मवंचनात्मक विकृती लोप पावते, व अशा प्रकारें संघर्षण संपून त्यांचें मीलन होतें; व नाटक आनंदपर्यवसायी होतें. संघर्षणाबद्दलचा हा सामान्य दण्डक व्यक्तिपरत्वें थोडा फार बदलतो परंतु स्थूलतः त्याचें अस्तित्व सर्व नाट्यकथानकांत आढळल्यावांचून राहात नाहीं.

संघर्षणातून नाट्यकथानकाचा उगम झाला तरी प्रसंगाची रचना व त्या बरहुकूम पात्रांची हालचाल व स्वभावरेखन करणें हें महत्वाचें अंग नाटककारास मोठ्या जोखमानें व कौशल्यानें पार पाडावें लागतें यासाठीं सामान्यतः नाटकाचा

पूर्वभाग कथानकाचो व पात्राची पूर्वपीठिका ( expired events ) कथन करण्यासाठीं राखून ठेवलेला असतो. याला इंग्रजींत बहुधा exposition—गत-वृत्तांत-दर्शन-असें म्हणण्याचा रिवाज आहे. हें गत-वृत्तान्त-दर्शन जेवढ्या-स्वाभाविकपणें व द्रुतगतीनें, परंतु स्पष्टपणें नाटककार दाखवील तेवढें त्याचें कौशल्य ज्यास्त असें मानावयास हरकत नाहीं. या वृत्तान्तदर्शनांत अत्यंत संयम राखून जरूर तेवढ्याच गोष्टी योग्य जोर देऊन कथन करण्याची हातोटी नाटककारास साधावी लागते. त्याबरोबरच सर्व महत्वाच्या पात्रांची ओळख-जरूरीप्रमाणें पूर्ण अगर अपूर्ण—करून द्यावयाची असते. पात्राच्या स्वभावविकासावरच जर नाट्यकथानक आधारलेलें नसेल तर एकदां पात्रांच्या स्वभावाची ओळख करून दिल्यानंतर पुनश्च त्या विषयाकडे वळण्याची गरज नाहीं; परंतु पात्रांच्या स्वभाव-विकासावरच जर नाट्यवस्तूची मुख्य मदार असेल तर प्रथम पात्रांची जुजबी ओळख करून दिल्यावर तेंच काम विशेष कौशल्यानें सर्व नाटकांत करीत राहणें भाग पडतें. परंतु ही गोष्ट दोन तीन मुख्य पात्रें सोडल्यास इतर पात्रांच्या बाब-तींत चालू ठेवल्यास नाटक अस्पष्ट होऊन अयशस्वी होण्याची भीति असतें; परंतु शेक्सपीयर ते इबसेन अशा प्रकारची स्वभावपरिपोषावर आधारलेलीं अनेक नाटकें यशस्वी झाल्याचें आढळून येईल; मात्र सामान्य नाटककारास हें कसब साधत नाहीं. सामान्य नाटककारानें अशा प्रकारचा प्रयत्न सहसा करूं नये एव-ढेंच विधान या ठिकाणीं अभिप्रेत आहे! कादंबरीकाराला पात्राच्या स्वभावविकासा-साठीं अनेक साधनें असतात, त्याचप्रमाणें कालावधीहि भरपूर असतो. अनेक प्रसंगातून व परिस्थितींतून आपल्या मुख्य पात्रास जावयास लावून त्या योगें त्याच्या स्वभावचारित्र्याचा प्रत्यक्ष प्रत्यय कादंबरीकारास देतां येतो; शिवाय स्वतःची टीका जरूर त्या ठिकाणीं घालून पात्रांची भूमिका स्पष्ट करतां येते. नाटक-कारास सर्व सोयी मिळत नाहींत. मात्र प्रत्यक्ष प्रयोगाच्या वेळीं त्याला पात्राची जिवंत प्रतिमा प्रेक्षकापुढें ठेऊन ( नट योग्य असल्यास ) आपल्या पात्रांचा ज्यास्त स्थिर प्रत्यय देतां येतो. परंतु अंतर्गत भावनाकल्पनांचा खेळ, त्याचप्रमाणें मूळ भूमिका व तिला मुरड देणाऱ्या परिस्थितीची अखंड परंपरा, त्याला मोठ्या कौशल्यानें ध्वनित करावी लागते. मुख्य पात्रांबद्दलची माहिती इतर पात्रांकडून देणें, त्यांच्या स्वभावावर इतर पात्रास टीका करावयास लावणें, व तदूनंतर प्रत्यक्ष वाग्विषयीभूत पात्रांस कार्य करावयास लावून व आपलें मनोगत बोलावयास

लावून इतरांनीं त्याच्याविषयीं दिलेल्या माहितीस स्थिरता देतां येते. इब्सेन सामान्यतः दोन नोकरांमधील संवादाच्या द्वारें थोडक्यांत परंतु मोठ्या खोंचदारपणें संविधानकाची पार्श्वभूमी, पात्राचा गत वृत्तान्त, व पुढील कृतीचें बीजारोपण करीत असतो. परंतु तीच तीच पद्धत वारंवार वापरल्यास कल्पनादारिद्य प्रत्ययास येतें. जुन्या नाटककारांस स्वगत भाषणें भरपूर पेरून हें कार्य ज्यास्त सुलभतेनें करतां येत असे. परंतु अर्वाचीन नाट्यशास्त्र स्वगत भाषणें स्वाभाविकतेच्या अभावामुळें त्याज्य मानीत असतें. या वादविवादजनक प्रश्नाचा सांगोपांग विचार या ठिकाणीं अप्रस्तुत होईल, परंतु जातां जातां एवढें म्हणतां येईल कीं सर्व कला मुळांतच स्वाभाविकतेच्या आभासावरच आधारलेली असल्यामुळें स्वगत भाषणें पाल्हाळिक व कलाहीन नसल्यास त्यांत कांहीं औचित्यदोष आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. प्रसंगीं मनुष्य आपले विचार स्वतःशीच बोलत नाहीं असें नाहीं; त्याचप्रमाणें जोरदार विकाराच्या जोरांत मनुष्य आपल्या भावना स्वतःशी व्यक्त करीत नाहींच असें म्हणतां यावयाचें नाहीं. शिवाय मुळांत स्वगत भाषणें मनोव्यापाराची बाह्यक्रिया या दृष्टीनें घालण्याची प्रथा आली असावी. आधुनिक तंत्राप्रमाणे हे मनोव्यापार प्रत्यक्ष बोलून दाखविण्याच्या ऐवजी बाह्य हालचालीनें दाखविणें ज्यास्त स्वाभाविक मानलें जाते. इब्सेनच्या "Ghosts" मध्यें मनांतील खळबळ व्यक्त करण्यासाठीं अनेक हालचाली उपयोगांत आणल्या आहेत. परंतु एकंदरींत विचार करतां स्वगत भाषणें सर्वस्वी वर्ज ठरविणें योग्य होणार नाहीं; उलट योग्य प्रसंगीं त्रोटक स्वगत भाषणें घातल्यास रसहानी न होतां तीं रसोत्कर्षास कारणीभूत होतात, असाच अनुभव येतो. मात्र स्वगत भाषणांचा अतिरेक अस्वाभाविकताजनक तर होतोच होतो, पण त्याहूनहि नाटककाराचें कल्पनादारिद्य ज्यास्त उघड होतें. मनांतील भावना स्वगत भाषणानें व्यक्त करण्यापेक्षा अभिनयानें व्यक्त करणें ज्यास्त श्रेयस्कर यांत कांहीं शंका नाहीं, तथापि हें कार्य साधण्यास नाटककारांस नटाचें नितांत साह्य अभिप्रेत मानावें लागतें. स्वगत भाषणाचा हा प्रश्न विस्तारानें विचारांत घेणें या ठिकाणीं स्थलाभावास्तव शक्य नाहीं.

गत–वृत्तान्त–कथन हा नाटकाचा पूर्वभाग जेवढा सुटसुटीत, स्पष्ट व गतिप्रेरक असेल तेवढा तो जास्त यशस्वी मानणें भाग असतें. या पूर्वभागांत कृतीपेक्षांहि संभाषण, प्रसंगदर्शनापेक्षाहि प्रागूकथन, वर्तमान अगर भविष्यकालीन

हकिगतीपेक्षाहि भूतकालीन कार्याचा आविष्कार ज्यास्त करावा लागतो. मात्र या भूतकालीन घटनांचा आविष्कार पुढें घडणाऱ्या (किंवा घडून आणविल्या जाणाऱ्या) घटनांना प्रेरक त्याच प्रमाणें कार्यकारणभावानें संबद्ध असावा लागतो. त्यातील कांहीं दुवे प्रथम न दाखवून त्या योगें उत्सुकता वाढविणें इष्ट असतें; मात्र कोणत्या गोष्टी अध्याहृत ठेवाव्या व कोणत्या गोष्टी स्पष्ट कराव्या याचा विचार परिणामाच्या दृष्टीनें ठरविणें योग्य असतें.

कोणत्याहि नाटकाचा हा पूर्वभाग ज्यास्त महत्वाचा असल्यामुळें या ठिकाणीं त्याचा थोड्या विस्तारपूर्वक विचार करणें भाग पडलें. याच भागांत पुढील कथाविस्ताराचीं पूर्वसूत्रें टाकून त्यांची गुंतागुत पुढील अंकात वाढवीत न्यावयाची असते. संघर्षणाच्या मुख्य घटकावयवांची ओळख करून दिल्यावर संघर्षाचा पुढील विकास प्रसंगानुरोधानें व स्वभावविकासानें साधण्यासाठीं व्यक्ती आणि प्रसंग यांचें एकमेकावराल आघातप्रत्याघात, जरूर असलेल्या उपकथानकाचे धागेदोरे मूळ कथानकाशीं विणीत नाटयकथेची गती उत्कर्षबिंदूपर्यंत ( climax ) चढवीत न्यावयाची असते; तदनंतर कथानकाचे गुंतलेले धागे सोडवून कथेच्या अंतिम उद्देशाकडे नाटयवस्तूची गती न्यावयाची असते. अशा प्रकारें सामान्यतः कोणत्याहि नाटकाचे तीन विभाग थोड्या फार प्रमाणांत पडत असतात. अर्थात् हे भाग स्वयंपूर्ण असतात असा मुळींच अर्थ नाहीं; परंतु सामान्यतः या तीन विभागाच्या सरहद्दी स्थूल दृष्टीनें दाखविणें शक्य असतें. त्याचप्रमाणें कथानकाची चढउतार कशी विभागावी याबद्दल कांहीं ठोकळ नियम सांगणे फार कठीण आहे; प्रायः पांच अंकी नाटकात तिसऱ्या अंकाच्या अन्तापर्यंत कथानक उत्कर्षबिन्दू गाठींपर्यंत चढत जातें व नंतर तें उतरत शेवट पावत असतें. सर्व नाटकें बांधीव व घटीव बांध्याचीच असतात असें म्हणतां यावयाचें नाहीं, तथापि कादंबरीपेक्षा--किंबहुना इतर कोणत्याहि वाङ्मयप्रकारापेक्षा-नाटकाचा बांधा ज्यास्त रेखीव, सुघटीत व बांधीव असावा लागतो. विषयांतर, विसंवादी दृश्यें, फालतु पात्रें नाटकांत सहसा खपून जात नाहींत. इतकेंच काय तर संवाद, वादविवाद देखील मोजके, नेमके, व कथानकाची गती पुढें नेणारेच असावे लागतात. शेंकडों कांहीं नाटकें विचारनावीन्यानें त्याचप्रमाणें जोरदार, खोंचदार, विनोदी भाषणानें रमणीय झालीं तरी, पुष्कळदा रचनेच्या दृष्टीनें स्पृहणीय असतात असें म्हणतां यावयाचें नाहीं. वरेर-

करावें 'हाच मुलाचा बाप' व 'संन्याशाचा संसार' या दोहोंमधील फरक उदाहरणार्थ घेतां येईल.

शेवटीं नाट्य-संवादाबद्दल थोडा ऊहापोह अप्रस्तुत होणार नाहीं. नाटकांत कथा विशद करण्याचें मुख्य माध्यम म्हणजे संवाद होय; याच्या खालोखाल नटाचें हावभाव व हालचाल, आणि रंगभूमीवरील सजावट यांचें स्थान लागेल. परंतु नाटककाराच्या दृष्टीनें हीं दुय्यम साधनें असून नसल्यासारखींच असतात. त्यांचा उपयोग नाटक तयार करतांना त्याला फक्त रंगसूचना देतानांच करतां येतो. यामुळें संवाद हें एकच माध्यम त्याला ध्यानांत घ्यावयाचें असतें. नाटकांत संविधानकाच्या घटने खालोखाल तसें पाहिल्यास संवादास महत्व आहे. याचा अर्थ संवाद भाषा-सौष्ठवानें नटलेले असलेच पाहिजेत असा मुळींच नाहीं. नाटकाचें जें वातावरण असेल व ज्या दर्जाचीं पात्रें त्यांत रंगविलेलीं असतील त्यावर संवादाच्या भाषेचा दर्जा ठरवावयाचा असतो. कोळी, माळी, साळी यांचें जीवित रंगविणाऱ्या नाटककारानें संस्कृतप्रचुर उपमा उत्प्रेक्षांनीं नटलेलीं, कोट्यांनीं शृंगारलेली भाषा घालणें कधींच योग्य नाहीं. पात्रानुसार व प्रसंगानुसार संवादाची भाषा बदलण्यांतच आणि त्यायोगें ती स्वाभाविक व व्यक्तिस्वभाव व चारित्र्यनिदर्शक करण्यांतच नाट्यलेखकाची कसोटी आहे. सर्व पात्रें जरी वक्रोक्ती व व्याजोक्तीने बोलूं लागलीं तरी त्यासाठीं नाटकाचें वातावरण निराळें कल्पिणें भाग पडतें. शेक्स्पीयरनें आपल्या पहिल्या नाटकांत अशा प्रकारचे संवाद घातले आहेत, परंतु त्यासाठीं पात्रें व त्याचें वातावरण त्या संवादांस योग्य असेंच निर्माण केलेलें आहे. अर्थात् हा विवेक शेक्स्पीयरच्या पहिल्या नाटकांत पुष्कळदां राखलेला आढळून येत नाहीं. त्याकाळीं सर्वांना, विशेषतः तरुण दरबारी लोकांना प्रिय झालेल्या ('Euphemistic') (मराठींत म्हणावयाचें झाल्यास गडकरी खांडकरी थाटाची ) या अस्वाभाविक नटव्या भाषेचे शेक्स्पीयरवर देखील ( कदाचित् लिव्ही व ग्रीन, या नाटककारांच्या साहचर्यामुळें ) बरेंच दडपण असावें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे नाट्य-संवाद हा बोलणाऱ्या भूमिकेनुसार, संस्कारांनुसार व विशेषतः त्यावेळच्या विकारानुसार असला पाहिजे. याठिकाणीं दुसरा एक गौण मुद्दा चर्चिण्यासारखा आहे तो म्हणजे वातावरण निर्माण करण्यासाठीं पात्राच्या तोंडीं प्रान्तिक बोली घालणें कितपत योग्य होईल. वऱ्हाडी माणूस ग्रांथिक मराठी रंगभूमीवर बोलूं लागल्यास त्याचें भाषण स्वाभाविक अगर

वातावरण निर्माण करण्यांस योग्य होणार नाहीं. किंवा शिवाजी आणि संभाजी आजची मराठी बोलूं लागल्यास तें युक्त होणार नाहीं. परंतु त्यांच्या तोंडी जुनी मराठी भाषा घातल्यास शेकडा नव्वद प्रेक्षकांस फारशी-मराठी कोश बरोबर घेऊन नाटक पहावें लागेल. गडकऱ्यांच्या " राजसंन्यासांत " हीच चूक दिसून येते. जुन्या वातावरणाचा आभास भाषा, पोशाख, व सजावट यांच्या योगानें झाला पाहिजे यांत कांहीं शंका नाहीं, तथापि भाषा पूर्ण जुनी ठेवली असतां ती दुर्बोध होऊन मुख्य उद्देशच लयास जातो. याबाबतींत वॉल्टर स्कॉटनें जो दण्डक स्वानुभवानें दिला आहे तो ध्यानांत घेण्याजोगा आहे. तो म्हणतो, " सामान्य भाषेला किंचित् जुनी मुरड देऊन त्यायोगे जुन्याचा आभास निर्माण करावा, परंतु पूर्ण गीर्वाण भाषा वापरून कथावस्तू दुर्बोध करणें इष्ट होणार नाहीं." वेव्हर्ली नंतरच्या सर्व ऐतिहासिक कादंबऱ्यांना स्कॉटनें हाच नियम कसोशीनें पाळल्यामुळें आजहि त्याच्या कादंबऱ्या टिप्पणांविना वाचतां येतात; इतकें असूनहि ऐतिहासिक वातावरण त्यांतून प्रत्ययास येतें. हीच कल्पना प्रान्तिक बोलीस लावतां येईल कोकणांतून येणाऱ्या माणसास कोंकणींत बोलावयास लावण्यांपेक्षां एखादा दुसरा कोकणी शब्द-ज्या शब्दाचा अर्थ संदर्भानें कळण्यासारखा आहे- वापरून व भाषेस थोडी मुरड देऊन त्यांच्या भाषणास स्वाभाविकता देणें निदान नाटकांत तरी योग्य ठरेल. 'संशयकल्लोळांत' रेवतीच्या तोंडी कांहीं कंपन्या गोमान्तकीय भाषेंत कांहीं वाक्यें घालून असा आभास उत्पन्न करण्याचा प्रयत्न करतात, तो पुष्कळदां यशस्वी होतो.

(४)

वर उल्लेखिलेली सर्व तात्विक चर्चा सर्व नाट्यप्रकारांस सामान्य असल्यामुळें ती एकांकिकेस देखील लागू आहे, हे निराळें सांगावयास नकोच. तसे पाहिल्यास एकांकिकेंत व पूर्णकृति नाटकांत आकारापलिकडे ( व आकारामुळें येणाऱ्या कांहीं परिणामापलिकडे ) कसलाच फरक नाहीं म्हटलें तरी चालेल. जें पिण्डीं तें ब्रम्हाण्डीं हें तत्व पूर्णकृती नाटकें व एकांकिका यांच्या बाबतींतहि खरें आहे. सहा फूट उंचीचा माणूस व तीन फूट उंचीचा पूर्ण वाढ झालेला खुजा माणूस यांच्यांत उंचीपलिकडे ( व उंचीमुळें येणाऱ्या कांहीं फायद्यातोट्याखेरीज ) कसलाच फरक नसतो. अवयव, बुद्धी, स्वभावधर्म हे सर्व दोघांसहि

( व्यक्तिभेद वगळता ) सारखेच आढळतील हीच गोष्ट पूर्णकृति नाटक व एकांकिका यांच्या बाबतींत खरी आहे. पूर्णकृती नाटकांत दोन अगर तीन कथानकें देखील गुंफता येतील, परंतु एकांकिकेच्या कथानकांत सुटसुटीतपणा जरूर असल्यामुळें, एकाहून जास्त कथासूत्रें समाविष्ट करतां येत नाहींत; इतकेंच काय पण एकच कथानक सर्व दृष्टींनीं समृद्ध करून विकसित करावयास देखील एकांकिकेंत जागा नसते. कोणतेंहि नाटक सामान्यतः प्रासंगिक (episodic) असूं शकत नाहीं. तथापि पूर्णकृती नाटकांत प्रसंगांची गुंफण थोडी सैल असली तरी चालतें. कधींकधीं सापेक्षत्वानें प्रसंगांचा अगर स्वभावपरिपोषाचा उठाव करण्यासाठीं प्रत्यक्ष कथानकाशीं सूत्रबद्ध नसलेले कांहीं प्रसंग अगर पात्रें पूर्णकृती नाटकांत घातलीं जातात; परंतु एवढें स्वातंत्र्य एकांकिकेच्या बाबतींत घेणें शक्य होत नाहीं. मोजके प्रसंग, मोजकीं पात्रें, व स्थिर पार्श्वभूमी एकांकिकेच्या संवर्धनास पोषक ठरतात. त्याचप्रमाणें स्वभावरेखन अगर स्वभावांच्या खोल अगर सुप्त विभागांची प्रसंग आणि परिस्थितीप्रमाणें होणारी उत्क्रांति एकांकिकेंत दाखविणें शक्य नाहीं. लेडी मॅक्बेथ अगर हॅमलेट् यांच्या मनाचें पृथक्करणात्मक सखोल दिग्दर्शन पूर्णकृती नाटकामध्यें ज्याप्रमाणें दाखविता येतें त्याप्रमाणें एकांकिकेंत दाखविणें कठीण आहे. तें मुळी शक्यच नाहीं असें म्हणणें धाडसाचें होईल, कारण अशक्य गोष्टी खरा कलावन्त प्रसंगविशेषीं साधू शकतो. याचें उदाहरण लेडी ग्रेगरीचें ' धी राईझिंग ऑफ दी मून " अगर ज्यो कोरीचें " ह्यूअर्स् ऑफ् कोल् " अगर जॉ. ओ. फ्रान्सीस्ची " बर्ड्स् ऑफ ए फेदर " ह्या एकांकिका उदाहरणार्थ घेण्यासारख्या आहेत. प्रसंगाच्या अनुभवानें सुप्तभाव मानवी मनांत जागृत कसे होतात हें या दोन एकांकिकेंत मोठ्या चातुर्यानें दाखविलेलें आहे. त्याचप्रमाणें हॅरोल्ड ब्रिगहाऊसच्या " फॉलोअर्स् " या एकांकिकेंत मतपरिवर्तन रंगविलेलें आहे. तथापि सामान्यतः परिस्थितीनें बदलणाऱ्या स्वभावाचें संपूर्ण चित्र एकांकिकेंत दाखविणें अशक्यप्राय आहे. त्याचप्रमाणें एकांकिकेच्या लघु-संभारामुळें ( मोठ्यांत मोठी एकांकिका चाळीस मिनिटांच्या कालावधींत संपावी असा सामान्य प्रघात आहे. ) त्यांत वातावरण, स्वभावरेखन, उत्सुकताजनक प्रसंगरचना, काव्यविलास, आणि तत्वविकास, एकसमयावच्छेदेंकरून साधतां येत नाहीं. पूर्णकृती नाटकांत नाटककार कुशल असल्यास हे सर्व प्रकार एकाच नाटकांत समाविष्ट करणें अशक्य नाहीं. शेक्स्पी-

यर, इब्सेन, गॉल्सवर्दी, शॉ व पिरँदेलो यासारखे असामान्य प्रतिभेचे नाटककार आपल्या पूर्णकृती नाटकांत या सर्व बाजू योग्य प्रकारें सांभाळू शकतात; परंतु एकांकिकेत यांतील कोणत्याही एकावर विशेष भर देऊन, तिच्याच परिपोषाकडे सारें लक्ष केंद्रित करणें भाग पडतें. अनेक पात्रांच्या स्वभावरेखनाकडे लक्ष न देतां एका पात्रावर नजर ठेऊन इतर पात्रें निव्वळ पूरक पात्रें म्हणून ओझरतीं रेखाटावीं लागतात. रेखाचित्रांतील विषय-दर्शनाप्रमाणें जोरदार कुंचल्याच्या आघातानें, अतिशय परिमित शद्बांत, पात्रांची व पार्श्वभूमीची उभारणी करून तद्नंतर एकाच मुख्य पात्राच्या स्वभावदिग्दर्शनावर मदार ठेवावी लागते. त्याच-प्रमाणें एकांकिका प्रसंगनिष्ठ असल्यास मुख्य प्रसंगाची चित्ताकर्षक माण्डणी करण्याकरतांच इतर आनुषंगिक गोष्टीकडे लक्ष पुरवून सारी नाट्यशक्ति त्या प्रसं-गाच्या निर्मितीवर केन्द्रीत करावी लागते. लॉर्ड डन्सनी यांचीं " ए नाईट ॲट् ॲन् इन् " ही एकांकिका उदाहरणार्थ घेण्यासारखी आहे चार इंग्लिश खला-शांनीं एका हिन्दी देवळांतील देवीच्या मूर्तीच्या डोळयांत असलेले माणिक पळ-विले असून ते परत मिळविण्यासाठीं त्या देवीचे तीन पुजारी त्यांचा पाठलाग करीत इंग्लंडमधील एका गावीं जातात. तेथें ते तिघेहि त्या खलाशांच्या कपटास बळी पडतात. परंतु शेवटीं ती देवी आपलें रुद्र स्वरूप प्रगट करून त्यांच्या समो-रील तें माणिक घेऊन जाते. हा रौद्र प्रकार या एकांकिकेंत एवढ्या परिणामकारक पद्धतीनें चितारला आहे कीं, त्या परिणामासाठीं नाटकाची इतर सर्व अंगें अगदी त्रोटकपणें दिग्दर्शिलीं आहेत. लघुनाटकांत वातावरण निर्माण करणें कधींच शक्य नसतें, परंतु कांहीं एकांकिका निव्वळ वातावरण दिग्दर्शनार्थ लिहिलेल्या असतात. नोएल कॉवर्ड याचे "हँडस् ॲक्रॉस् धी सी" ही नाटिका अगर बेलजियन् कवी व कथा-लेखक मेटरलींक् यांची नाटिका, "धी स्ट्रेन्जर" निव्वळ वातावरण दर्शनार्थच लिहि-लेल्या आहेत. वर उल्लेखिलेल्या दुसऱ्या नाटिकेंत एका मध्यमस्थितींतील कुटंबांतील माणसांवर आजाऱ्याच्या खोलींत घटकापळें मोजीत असलेल्या वृद्धाच्या मरणाचा परिणाम मोठ्या कौशल्यानें चितारला आहे. याप्रमाणें एकंदरींत एकांकिकेंत कोणता तरी एक प्रसंग चितारण्याची प्रवृत्ती स्वाभाविक दिसते; व तो प्रसंगहि एका विशिष्ट दृष्टीकोणांतूनच रंगविला जातो. पार्श्वभूमि, त्याचप्रमाणें स्वभावपरिपोष हीं अंगें सामान्यतः प्रसंगनिष्ठ एकांकिकेंत त्रोटक परंतु खोंचदार पद्धतीनें रेखाटण्याची पद्धत रूढ आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. जे. एम्. सीन्ज् यांची

"रायडर्स् टू धी सी" ही एकांकिका या दृष्टीनें महत्वाची आहे. यांत मौर्या या वृद्ध कोळणीचें मर्मभेदी दुःखी जीवित त्यांतील एकच शेवटचा मर्मच्छेदक प्रसंग जोरदारपणें चित्रून नाटिकेच्या कथानकाची उभारणी केली आहे. मौर्याच्या घरांतील कर्ती पुरुष माणसें—सासरा, नवरा व मुलगे—एका मागून एक समुद्रांत बुडालेले आहेत. शेवटचा बार्टले आरान् बेटावरील आपल्या झोपडीतून आयर्लंडच्या किनाऱ्यावर शिंगरु विकण्यासाठीं समुद्रपार जावयास निघतो. म्हातारी मौर्या,—जिचा एक मुलगा अवघ्या आठदहा दिवसांपूर्वीच समुद्रावर गमावला आहे व त्याचें प्रेत किनाऱ्याला केव्हां तरी लागेल या कल्पनेनें जी वेडीपिशी होऊन सारा किनारा धुंडाळित असते—त्याला अडविण्याचा वृथा प्रयत्न करते. तिच्या दोन मुली तिलाच वेड्यांत काढतात. त्या अनुभवहीन मुलींस तिच्या पोळलेल्या मनाची तीव्र भावना कळत नाहीं; व शेवटीं बार्टले तिला न जुमानतां जातो. थोड्याच वेळांत त्याचें ओलेचिंब प्रेत घेऊन शेजारी येतात. शिंगरानें टांग मारल्यामुळें तो समुद्रांत पडून बोटीवर चढण्यांपूर्वी बुडतो. मौर्या आकांत करते व शेवटीं 'देवाची व दर्याची इच्छा' असें हताशपणें म्हणून शान्त पडते! मौर्याच्या तीव्र मनोभावनांची परिणती एवढ्या ठळक व मर्मग्राही पद्धतीनें चितारण्यासाठीं इतर साऱ्या—म्हणजे अवघ्या तीनच पात्रांचें स्वभावरेखन नाटककारानें अगदीं त्रोटकपणें केलें आहे. समुद्रपर्यटण हाच ज्यांचा व्यवसाय आहे त्यांनीं मरणाची भीति बाळगून काय उपयोग, अशी भावना अनुभवाची आंच न लागल्यामुळें मानणारी ती तीन ताज्या रक्ताची बहीणभावंडे व अनुभवानें पोळलेली व मायेनें आंधळी बनलेली मौर्या यांमधील संघर्षणाची शोकजनक व क्षोभकारक परिणती या एकांकिकेत सुंदर रीतीनें चितारली आहे. आरान बेटावरील कोळ्याचें धोक्याचें जीवित व इतर वातावरण अतिशय परिमित परंतु सूचक शब्दांत नाटककारानें रेखाटलें आहे. अशा प्रकारें परिमित साधनांनीं वातावरण अगर कालगती दाखविण्याची पद्धत मोठ्या कौशल्यानें कल्पक नाटककारानीं साधली आहे. बॅरीच्या "विल्" या नाटिकेंत सुमारें पन्नास वर्षांचा कालावधी तीन प्रवेशांत एका खोलींतील प्रामुख्यानें ठेवलेल्या त्यावेळीं तत्काभिषिक्त असलेल्या राजाच्या चित्रावरून सूचविलेला आहे. एका सॉलिसीटरच्या ऑफिसांत पहिल्या प्रवेशांत व्हिक्टोरिया राणीचा फोटो असतो, तद्नंतर सुमारें दहा वर्षांनीं घडणाऱ्या दुसऱ्या प्रदेशांत राजे सातवे एडवर्ड यांचा फोटो असतो

आणि शेवटच्या प्रवेशांत त्या जागीं राजे पंचम जॉर्ज यांचा फोटो असतो. अशा प्रकारें कालक्रम अगदीं मितव्ययाने या नाटिकेंत व्यक्त झालेला आहे. या नाटिकेवरून दुसरे दोन मुद्दे उघड होतात ते म्हणजे नाटिकेच्या कथासूत्राचा काळ किती मर्यादित असावा व एकांकिका एकच प्रवेशात्मक असावी किंवा काय ? या बाबतींत बंधनें घालण्याची कांहींच गरज नाहीं. मात्र कालावधी ज्यास्त घेतल्यास त्याप्रमाणें रचना करणें भाग पडतें व तें काम कौशल्यानें पार पाडावें लागतें. त्याचप्रमाणें एकांकिका प्रवेशात्मक नसावी असें मुळींच नाहीं. परंतु प्रवेश होतां होईल तो कार्य-स्थळ बदलण्यांसाठीं नसावेत कारण नाटिकेंत स्थळ बदलल्यास पुनश्च वातावरण निदर्शक सूचना संभाषणांत घालाव्या लागतात; त्याच प्रमाणें प्रत्यक्ष प्रयोग थोडक्यांत आटोपावयाचा झाल्यास अडचण येते. परंतु कालगती निदर्शित करावयास दुसरा मार्ग नसल्यामुळें पडदा टाकून प्रवेश बदलणें अयोग्य ठरत नाहीं. वर उल्लेखिलेली ‘ विल् ’ ही बॅरीची नाटिका या दृष्टीनें उत्कृष्ट उदाहरण आहे. गॉलस्वर्दीची “ लिट्ल् मॅन् , ” जेकब्ची “मन्कीज् पॉ” या नाटिका प्रवेशात्मकच आहेत. ड्रिन्कवॉटरची “ एक्स् = ० ” त्याचप्रमाणें जो कॉरींची “ ग्नुअर्स् ऑफ् कोल ” ही नाटिका देखील दोन प्रवेशांची आहे. अशा प्रकारें प्रवेशात्मक एकांकिकांची किती तरी उदाहरणें देता येतील; यावरून एकांकिका प्रवेशात्मक असूंच नयेत असें म्हणतां येणार नाहीं. मात्र प्रवेशांचा बदल बहुधा कालगती दाखविण्यासाठींच असतो; स्थलाचा बदल बहुधा प्रवेश बदलून करण्यांत येत नाहीं. याचें कारण उघडच आहे. अवघ्या चाळीस मिनिटाच्या कालावधींत संपणाऱ्या नाटिकेच्या प्रयोगाच्या वेळीं स्थित्यंतर दाखविण्यासाठीं दहा पंधरा मिनिटें रंगभूमीची सजावट करण्यासाठीं खर्च करणें योग्य ठरणार नाहीं ! तथापि दोनतीन मिनीटांत बदल करण्याजोगी साधी सजावट असल्यास प्रत्येक प्रवेशांत स्थित्यंतर करावयास तसें पाहिल्यास कोणतीच हरकत नसावी. मात्र स्थित्यंतरामुळें स्थलनिदर्शनासाठीं संवाद पाल्हाळिक होणार नाहींत अशी काळजी घेणें भाग पडते.

एकांकिकेच्या लघुमर्यादेंत प्रचाराला कितपत जागा आहे याचा विचार करण्याची कांहीं विशेष गरज नाहीं. पूर्णांकी नाटकांत देखील तत्वविवेचनास विशेष जागा असते असें नाहीं. पिरॅन्देल्लोच्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास

" नाटक हें कृतीप्रधान आहे, त्यांत तत्वचिकित्सेला जागा नाहीं !! " (Drama is action, Sir, action; not your confounded philosophy!) हें विधान जरी एकांगी मानलें तरी निव्वळ तत्वचिकित्सेवर उभारलेलीं नाटकें फारच थोडीं. याचा अर्थ तत्व विशद करण्यासाठीं नाटकें लिहूच नयेत अगर लिहीलीं जात नाहींत असा मुळीच नाहीं. कोणत्याही कलेच्या अनुभवांत—अगर अनुभवानंतर—रसज्ञाच्या मनोभूमिकेवर कांहीं तत्वें उमटल्या-वांचून राहात नसतात. कलेच्या भूमिकेनुसार तीं तत्वें संदिग्ध स्वरूपात अगर असंदिग्ध स्वरूपांत उद्भवतील, यांत कांहीं शंका नाहीं. गॉलस्वर्दी अगर इब्सेन यांच्या कोणत्याहि नाटकांत तत्वचर्चा आली नाहीं तरी प्रत्येक नाटकाचा उठाव एका विशिष्ट तत्वाच्या वातावरणांत केलेला असतो. (" The plot is developed in the atmosphere of an idea ) हीच प्रथा बहुतेक आधुनिक एकांकिकेस लागू पडते. कामगारांच्या जीवितावर आधारलेल्या सर्व नाटिका अप्रत्यक्षपणें प्रचारात्मकच असतात. पूर्वी उल्लेखिलेलें " ह्युअर्स् ऑफ् कोल " अगर " रायडर्स् टू सी " ह्या एकांकिका, उदाहरणार्थ घेतां येण्यांसारख्या आहेत तथापि तत्वचर्चा लघुनाटकांच्या संकुचित जागेंत भरतां येत नसते, असा सामान्य अनुभव आहे. "बॅक् टू मेथुसेल्ला" अगर "जॉन बुल्स् अदर आयलंड " ह्या शॉच्या नाटकांप्रमाणें तत्वचर्चेवर पूर्णपणें आधारलेल्या नाटिका यशस्वी झाल्याचें उदाहरण क्वचित्च सांपडतें.

मराठींत एकांकिकेचा प्रसार अलिकडेच झाला असला तरी, तो पाश्चिमात्य वाङ्मयाच्या परिशीलनाचा परिपाक आहे, असें म्हणता येत नाहीं. प्राचीन संस्कृत वाङ्मयांत एकांकिकेचीं उदाहरणें नाहींत असें मुळींच नाहीं. भासाची "दूतवाक्य" व " उरुभंग " उदाहरणार्थ घेतां येतील. तथापि मराठी एकांकिकेवर सारे संस्कार पाश्चिमात्य एकांकिकेचेच अगदीं आरंभापासून आहेत. गेल्या वीस बावीस वर्षांत तंत्रशुद्ध एकांकिका मराठींत रूढ झाल्या आहेत हें खरें असलें तरी प्रहसनात्मक एकांकिका जुन्या मासिकांच्या फाईलींत आजहि सांपडतील. हरिभाऊंच्या कांहीं एकांकिका सुप्रसिद्धच आहेत. मात्र या प्रहसनवजा नाटिका आजच्या एकांकिकाचे पूर्वज मानतां येणार नाहींत. हौशी नाट्यसंस्थांचा व नटांचा उदय व सिनेमाची स्पर्धा या दोन कारणांनी मराठी एकांकिका उदयास आल्या व त्यांची वाढ होण्याचीं चिन्हेंही आज दिसत आहेत.

( ५ )

शेवटीं रेडियो नाटिकेबद्दल या ठिकाणीं थोडा विचार करणें अप्रस्तुत होणार नाहीं. नाट्यरचना रंगभूमीवरील साधनानुसार बदलत गेली आहे, याचा उल्लेख वर आलाच आहे. परंतु नाटकांच्या मूळ स्वरूपांत फरक करण्याएवढा रेडीयोचा परिणाम झाला आहे असें म्हटलें तरी चालेल. रंगभूमीसाठीं नाटक रचतेवेळीं स्थल-कालाची मर्यादा नाटककारास बऱ्याच प्रमाणांत पाळावी लागते. कांहीं प्रसंग रंग-भूमीवर दाखविणेंच शक्य नसल्यामुळें ते प्रसंग कथानकाच्या विकासास जरूरच असल्यास त्यांचें वर्णन एक दोन पात्रांकडून करून घेऊन हें कार्य साधण्याची पद्धत आहे. या प्रथेस 'रिपोर्टेड ॲक्शन' अशी संज्ञा देण्याची सामान्यतः पद्धत आहे. " बॅटल ऑफ ॲक्टीयम् " शेक्स्पीयरनें ॲन्टनी आणि क्लिओपाट्रा नाटकांत अशाच प्रकारें रंगविली आहे. " कांचनगडची मोहना " या नाटकांत शेवटचें युद्ध एका व्यक्तीस रंगभूमीवरून त्याचें वर्णन द्यावयास लावून, व पड-द्यांतील तोफांच्या आवाजांची त्याला सांथ देऊन साधलें आहे. परंतु सिनेमाच्या पडद्यावर अशा प्रकारचे देखावे प्रत्यक्ष दाखवितां येतात. तरी पण त्यासाठींहि बरेच श्रम घ्यावे लागतात. परंतु रेडियोच्या नाटकात कोणताहि प्रसंग थोड्या श्रमानें चितारतां येतो. समुद्रावरील घनघोर वादळ, आजकालच्या अजस्र शस्त्रांनीं चाललेलें रणकंदन, भूकंपानें हालणारें शहर इत्यादि अशक्यप्राय प्रसंगदेखील रेडियोच्या नाटिकेंत चित्रित करणें थोड्या श्रमानें, व कल्पनेच्या कसरतीनें, निव्वळ भाषण व आवाज यांच्या योगें, निर्माण करतां येतात. सामान्य नाटक हें श्राव्य त्याचप्रमाणें दृश्य कलावस्तू आहे, परंतु रेडियो नाटिका ही सर्वस्वी श्राव्य कला-वस्तू असल्यामुळें पात्रांचा स्वभावच काय परंतु आकार, आविर्भाव, पोषाख, हाल-चाल, त्याचप्रमाणें स्थळ, काळ, परिस्थिती या सर्व गोष्टी, प्रत्यक्ष दिसत नसल्या-मुळें, किंवा त्यांचें वर्णन प्रत्यक्ष करणें शक्य नसल्यामुळें, संवाद व आवाज यांच्या योगानेंच स्पष्ट कराव्या लागतात. अर्थात् यांतील अनावश्यक गोष्टी टाळता येतात परंतु पात्राचें एखादें शारीरिक व्यंग कथानकाच्या विकासास जरूर असल्यास त्याची माहिती द्यावीच लागते. प्रवेश करणाऱ्या प्रत्येक नव्या पात्राचें आगमन ध्वनित करावें लागतें, अगर जाणाऱ्या पात्रांचें गमन व्यक्त करावें लागतें. "तुझ्या डोळ्यांत अश्रू कां दिसत आहेत ? " असा प्रश्न तशीच गरज असल्यावांचून रंग-

भूमीवरील नाटकांत विचारण्याची गरज पडत नाहीं; कारण त्या पात्राचा अश्रू-पूर्ण चेहरा प्रेक्षकांसमोर असतो. तेंच नाटक वाचीत असतां " डोळयांत अश्रू आणून" ही रंगसूचना वाचतांच वाचकांस पूर्ण कल्पना येते; परंतु रेडीयोवरील नाटिकेंत संवादांतच अशा मनःस्थिती निदर्शक शारीरिक चलनावलनाची सूचना द्यावी लागते. "चहा घ्या" असें एका पात्राने म्हटल्यावर पेल्याचा आवाज; "जातो" म्हटल्यावर पावलांचा आवाज; " दार उघड " म्हटल्यावर दार उघडल्याचा आवाज; मांजराचें अस्तित्व दाखविण्यासाठी त्यांचे " म्यॉंव " इत्यादि स्वर-योजना करावी लागते. स्थळ दाखविण्यासाठींहि अशीच योजना करावी लागते. गिरणीच्या आवारांत सीन असेल तर संभाषणांत त्याची सूचना थोडक्यांत देऊन मागे यंत्राची घरघर ऐकावयास यावी लागते. मोटरचें आगमन शिंग व मोटरच्या इंजिनची बंद करण्या पूर्वीची घरघर, श्रोत्यांस ऐकावयास लावून तद्द्वारा कल्पना देतां येते. हें सर्व आवाजाचें तंत्र बरोबर साधल्यास ( व ग्रामाफोन रेकॉर्डने हे सर्व आवाज स्वाभाविक रीतीनें निर्माण करणें शक्य असल्यामुळे ) रेडियो नाटिकेंत, रंगभूमीवर अशक्य असलेले वातावरण निर्माण करणें शक्य आहे. आकाशांत संचार करणाऱ्या विमानांत घडणारें नाट्य-कथानक रंगभूमीवर कधींच करणें शक्य नाहीं, परंतु कांहीं अंशी सिनेमाच्या पडद्यावर ( ज्याला बॅक् प्रोजेक्शन् म्हणतात त्या पद्धतीनें ) दाखविणें शक्य असलें तरी रेडियो नाटिकेंत विमानाच्या इंजिनची घरघर, व पात्रांच्या संभाषणांत त्यांच्या गगनसंचारी परिस्थितीबद्दल वेंचक सूचना घालून तो प्रसंग सहज रंगविता येईल. रेडियो नाटिका आपल्याकडे अद्याप बाल्यावस्थेंत आहे. आणि यामुळें तिच्या उज्ज्वल भवितव्याबद्दल आज विशेष चर्चा करणें शक्य नाहीं.

---

# १

## सैंपाकणी—

( दादासाहेब कंकणकर, रावबहादूर, यांच्या दादर येथील बंगल्याचा दिवाणखाना. साडेतीन-चारची वेळ आहे. दादासाहेब डॉक्टरकडे जाण्याच्या तयारींत बसले आहेत. यापूर्वींच ते जावयाला उठले असते. पण त्यांची एकुलती एक मुलगी मंदा, वय वर्षें एकवीस, गोरामोरा चेहेरा करून कबुलीजबाब देण्याच्या आवाजांत कांहीं तरी महत्त्वाच्या विषयावर त्यांच्याशीं बोलत आहे. हुतात्माचा चेहेरा करून दादासाहेब ऐकत आहेत आणि उत्तरें देत आहेत. )

**दादासाहेब** : पण मनू, तुझ्या सुखासाठींच मी हें सगळं सांगतोय् ना ?

**मंदा** : होय दादा. पण मला रघूशींच—

**दादासाहेब** : कसं तुला कळत नाहीं ? त्याच्याशीं लग्न करून तुला सुख का होणार आहे ? तुझ्यासारखी इंटरपर्यंत शिकलेली, घरंदाज मुलगी एका भिकारड्या आर्टस्कूलच्या मुलाबरोबर—

**मंदा** : दादा, तो कांहीं नुसता आर्टस्कूलचा विद्यार्थी नाहीं. जी. डी. आर्ट पास झालाय् तो. विलायतेला जायला त्याला स्कॉलर्शिपहि मिळणार आहे म्हणतात.

**दादासाहेब** : कसला जातो विलायतेला ! तुला स्वतः कांहीं वाटत नाहीं. पण लोक काय म्हणतील, याचं सुद्धां तुला कांहींच कसं वाटत नाहीं ? आपल्या घराण्याला—मला जगांत कांहीं मान आहे. उगाच आपल्या एखाद्या उपटसुंभाशीं तुला लग्न करूं दिलं, तर मला जगांत तोंड तरी दाखवायला येईल का ? माझ्या बरोबरीचे लोक मला म्हणतील काय ?

**मंदा** : लोकांचं काय !

**दादासाहेब** : लोकांचं कांहीं नाहीं ! नोकरींतून पेन्शन घेऊन रिटायर झालों म्हणून मी अगदींच उठलों नाहीं जगांतून अजून ! त्या भिकारड्याला माझ्या घरांत येऊं जाऊं दिला आणि तुझ्याशीं मोकळे-पणानें वागूं दिला हीच चूक केली असं मला वाटतं. तो असं कांहीं करील असं मला वाटतच होतं; पण तूं वहावणार नाहींस याची मला पूर्ण खात्री होती. तुझ्या आईची आणि त्याच्या आईची मोठी मैत्री, म्हणूनच ती मेल्यावरसुद्धां माझ्या दारावर त्याला मी उभा केला. नाहींतर मला तो कधींच आवडत नव्हता.

**मंदा** : पण त्यानं असं केलं आहे तरी काय, दादा ?

**दादासाहेब** : कांहीं नाहीं ! चोर कुठला. त्याला दारावर उभा केला, त्याची ही फेड करतोय. नीच मनुष्य ! आणि तूं सुद्धां—मी आतांपर्यंत तुझ्यावर जीवापलीकडे माया केली, तुझे सांगशील ते लाड

पुरवले, तुला हवी ती मोकळीक दिली, त्याचं चांगलं प्रायश्चित्त देते आहेस मला !

**मंदा** : मी करूं तरी काय, दादा ?

**दादासाहेब** : काय वाटेल तें कर, पण माझी हात जोडून तुला एकच विनंति आहे, कीं मी एकदां डोळे मिटले—आणि फार वर्षे तुला वाट पहायला नको—मग काय दिवे लावायचे आहेत ते लाव !

**मंदा** : ( तिच्या डोळ्यांतून पाणी वहातें. पदारानें डोळे पुशीत ) माझ्या सुखासाठीं मी तुमच्या जिवावर उठलें आहें, असं का तुम्हाला वाटतं ? मी रघुशींच काय पण कुणाशींच लग्न करणार नाहीं, असं तुम्हाला वचन देतें, मग तर झालं ?

**दादासाहेब** : ( तिचा हात आपल्या हातांत घेऊन थोपटीत ) वेडी कुठली ! रडूं नकोस. मी करतों तें तुझ्या हितासाठींच करतों. बेटा, मला म्हाताऱ्याला तरी दुसरं कोण आहे ? मघांशीं तुझ्या अंगावर ओरडलों म्हणून रागावूं नकोस तूं—हे ब्लडप्रेशरचे अटॅक्स यायला लागल्यापासून माझा स्वभाव जरा चिडखोर झालाय खरा. ( छातीला हात लावून ) आई ग !

**मंदा** : खरंच दादा, तुम्हाला डॉक्टरकडे जायचंय ना ? कालच्या-सारखे आजहि चुकवूं नका; नाहीं तर पुन्हां छातींत दुखायला लागायचं. (त्यांची टोपी आणि काठी आणून त्यांच्या हातांत देते. ते जायला उठतात.)

**मंदा** : संध्याकाळीं थोडा भात जेवणार का दादा, कीं कालच्या सारखाच 'टोस्ट' पाहिजे ?

**दादासाहेब** : ओहो ! तूं आतां सुग्रण स्वयंपाकीण झाली आहेस.

**मंदा** : काय आहे मोठं त्यांत ? स्वयंपाकिणीची तरी मिजास हवी कशाला ? आपला शिवा भाजीबिजी चिरून सगळं कांहीं हाताखालचं तयार करून देतो.

**दादासाहेब** : मिळेल चारपांच दिवसांत दुसरी एखादी. तुझ्या मैत्रिणींना सांगून ठेवलंयस ना तूं ?

**मंदा** : मिळेल तर काय झालं, पण सीताबाईंना तुम्ही उगीच काढून टाकलंत, दादा. तुम्ही कांहींहि म्हणा.

**दादासाहेब** : ( चमकून ) उगीच कसं ? अग, एक नंबरची बद-माष होती ती. तो 'भाऊ' 'भाऊ' म्हणून तिला नेहमीं वेळींअवेळीं भेटायला यायचा तो तिचा मुळींच भाऊ नव्हता. असल्या बाया आमच्या घरांत नकोत आहेत. बरं आहे. येतों मी जाऊन डॉक्टरकडे. (निघून जातात. मंदा अस्वस्थपणें दिवाणखान्यांत फिरते. दादासाहेब जाऊन दोनचार मिनिटें झालीं नाहींत तोंच रघू प्रवेश करतो. वय वर्षें पंचवीस. पायांत चपला. त्यावर पँट. उघड्या गळ्याचा शर्ट; त्यावर बटनें न लावलेला कोट. डोक्यावर कांहीं नाहीं. काखेंत एक स्केच–बुक.)

**रघू** : गेले दोनचार दिवस दादासाहेब या वेळेला बाहेर जातात असं पाहून मी 'लेन'च्या एका बाजूला मघांपासून वाट पहातच उभा होतों. ते बाहेर पडलेले पहातांच वर आलों.

**मंदा** : म्हणजे ? हें काय भलतंच ?

**रघू** : भलतंच नाहीं. मी इथें आलेला त्यांना मुळींच आवडत नाहीं. मी आलेला पाहिल्यावर ते असा कांहीं चेहरा करतात, कीं त्यापेक्षां सरळ ते मला ' चालता हो ' म्हणून धक्का मारून बाहेर

घालवतील तर बरं. असल्या अपमानास्पद स्थितींत या घरांत पाऊल टाकणं मला अलिकडे, अलिकडे अगदीं असह्य झालं आहे. पण तुझ्या-साठीं नाक मुठींत धरून मी सगळं सहन करतों. मग बोल—काय ठरलं तुझं ? I definitely want a final reply to-day. या अपमानांचा आणि या चोरटेपणांचा मला वीट आला आहे अगदीं.

**मंदा** : आजच अगदीं असं काय झालं आहे ? असं काय, रघू. उगाच काय घाई करतोस ? आणखी थांब ना थोडे दिवस.

**रघू** : एक क्षणभरहि थांबायला मी तयार नाहीं. I say, I can't bear it.

**मंदा** : असं काय करतोस रे ? दादांची मला भीति वाटते. दादांना मी लग्न केलेलं मुळींच आवडणार नाहीं. त्यांचं म्हातारपणीं मी कसं मन दुखवूं ?

**रघू** : आणि माझं मन दुखवायला मात्र तुला कांहींच वाटत नाहीं. मी फुकटचा रस्त्यावर पडलोंय् ?

**मंदा** : तसं नव्हे रे. पण दादानीं माझ्यासाठीं इतकं केलंय्.

**रघू** : मग तुझं म्हणणं काय ? लग्न केलंस तर तुझे दादा कुठे अरण्यांत जाऊन पडतील कीं काय ?

**मंदा** : असं कांहीं तरी बोलूं नकोस, रघू. पण मी असं एकदम कांहीं तरी केलं, तर त्यांना शॉक् बसेल. त्यांत अलीकडे आणखी त्यांचं ब्लडप्रेशर वाढलंय्.

**रघू** : तुझ्या या टोलवाटोलवीचा मला आतां संताप येतो. दोन वर्षांपूर्वी म्हणत होतीस मला बी. ए. होऊंदे ! मग बघूं या. मी गप्प

बसलों. मग इंटर फेल् होऊन कॉलेज सोडून घरीं बसलीस. गेल्या वर्षीं सांगायला लागलीस, तूं– तुझी फायनल् परीक्षा आधी पास हो. ती मी यंदा पास झालों.–I got a job also.–आणि आतां म्हणतेस वडिलांना शॉक् बसेल. म्हणजे तुला माझ्याशीं कधींच लग्न करायचं नाहीं. Why did you fool me so long ?

**मंदा** : माझं तुझ्यावर खरोखरच प्रेम आहे, रघू. पण दादांना मला दुखवतां येत नाहीं. काय करावं मला खरंच समजत नाहीं.

**रघू** : हें तुला अगोदर माहीत नव्हतं ? माझ्या आयुष्यांतली इतकी वर्षं–हो आज चार वर्षं झालीं–कां फुकट घालवलींस ?

**मंदा** : मी पुन्हां सांगतें, रघू; माझं तुझ्यावर खरं खरं प्रेम आहे.

**रघू** : मग अशी टोलवाटोलवी कां करतेस ? आतांच्या आतां मला काय तो जबाब दे.

**मंदा** : तुला कांहीं समजत नाहीं, रघू. मला तसं खरंच करतां येत नाहीं. पण माझं तुझ्यावर प्रेम आहे.

**रघू** : खूप झालं तुझं हें ढोंग. I have heard that a thousand times ! माझ्या प्रश्नाला सरळ जबाब दे. तुला शेवटीं जर मला हेंच सांगायचं होतं तर माझ्या आयुष्याचीं इतकीं वर्षं फुकट कां घालवलींस ?

**मंदा** : माझ्यासाठीं आणखी वाट पाहूं नकोस, झालं ? माझं तुझ्यावर प्रेम आहे; पण तूं वाटेल त्या मुलीशीं लग्न कर आणि सुखी हो.

**रघू** : तें तूं नको मला सांगायला. मी पाहीन काय करायचं तें. तूं करणार आहेस कीं नाहींस बोल.

**मंदा** : तें मला खरंच कांहीं सांगतां येत नाहीं, रघू. तुला काय वाटेल तें कर तूं.

**रघू** : अस्सं ! So, that is your reply. माझ्यापेक्षां that notorious old fool-तुझे वडील तुला जास्त वाटतात !

**मंदा** : ( एकदम ओरडून ) Shut up ! माझ्या दादाविषयीं भलतेसलते शद्ब मी ऐकून घेणार नाहीं.

**रघू** : तूं ऐकून घेणार नाहींस आणि घरांतल्या घरांत तुला कांहीं माहितीहि नसेल. But that's a fact, the whole world knows it !

**मंदा** : ( रागानें बेभान होऊन ) Shut up, you shut up-मी मुळींच तुझ्याशीं लग्न करणार नाहीं. चालता हो तूं इथून.

**रघू** : हा मी चाललों—I care a hang for you—तुझ्या-सारख्या छप्पन पोरी पाहिल्या आहेत. you rot here with that d-d Oedipus ! I'm going ( निघून जातो. मंदा घामाघूम होऊन कोचावर अंग टाकते, आणि डोकें धरून बसते. उशींत डोकें खुपसून ती स्फुंदून स्फूंदुत रडूं लागते. चार पांच मिनिटें अशींच जातात. दिवाणखान्यांतल्या घड्याळांत ठण, ठण, ठण, पांचाचे ठोके पडतात. मंदा डोकें वर करते. इतक्यांत उघड्याच असलेल्या दरवा-जांतून तिची मैत्रीण कालिंदी, वय वर्षे बावीस, आंत येते. )

**कालिंदी** : काय ग, काय झालं, मंदा ? रडतेस कां अशी ?

**मंदा** : छे: रडतें कुठें ( डोळे पुशीत ) काय झालंय मला ?

**कालिंदी** : मला बनवूं नकोस, अं. काय ग झालं ?

**मंदा** : कांहीं नाहीं ग, पण एकदम कशी आलीस आज ? होतीस कुठें इतके दिवस. कित्ती निरोप धाडले मी तुला ग ?

**कालिंदी** : नाहीं ग, मला वेळ नाहीं झाला. पण तुला यायला काय झालं होतं ?

**मंदा** : आमच्याकडे सैंपाकीण नाहीं ग गेले आठ दिवस. तूं दिलेली सीताबाई गेली. मीच करतें ना सगळं. कुणी आहे का ग तुमच्या माहितीची ?

**कालिंदी** : तुमच्या सैंपाकणींना होतं काय ग ? पहावं तेव्हां आपली सैंपाकीण नाहीं ही ओरड आहे. काम तर मेलं दोन तीन माणसांचं.

**मंदा** : नाहीं टिकत खऱ्या, बाई. कुणी चोरट्याच निघतात, तर कुणाचे 'भाऊ—'च त्यांना भेटायला येतात !

**कालिंदी** : म्हणजे....?

**मंदा** : अग त्या सीताबाईला 'भाऊ' म्हणून कुणी भेटायला येत असे. दादानां कळलं कीं, तो भाऊ नाहीं नि कुणी नाहीं, असाच कुणी तरी टोळभैरव आहे. त्यानीं ताबडतोब काढून टाकली तिला. मी नव्हतें तेव्हां, मी गेलें होतें खारला मावशीकडे रहायला आठ दिवस.

**कालिंदी** : तो सीताबाईचा भाऊच होता. उगाच काय ? तो उंच किडकिडीत दाढी वाढलेला तो ना ?

**मंदा** : हो.

**कालिंदी** : मग तो तिचा भाऊच. उगाच काय आपलं गरीब झाली म्हणून कांहींतरी बोलायचं ? आमच्या आईच्या माहेरच्या

गांवची होती ती. आणि तो तिचा भाऊ आहे, हें आम्हांला नक्की माहीत आहे. काय बाई तुम्ही तरी !

**मंदा** : कुणाला ठाऊक बाई काय तें. आतांशा सैंपाकीण नाहीं एवढं खरं. पण तूं आज आलीस तें मला किती बरं वाटलं म्हणून सांगूं.

**कालिंदी** : अग हो. मघांशीं बोलतां बोलतां पुन्हां विसरलेंच मी. दुसऱ्याच गोष्टी काढून मला बनवूं पहात होतीस होय ? काय ग–कां ग रडत होतीस ?

**मंदा** : नाहीं ग. उगाच आपलं डोळ्यांत पाणी आलं झालं.

**कालिंदी** : मंदा, तुझं सोंग खूप झालं. खरंच तुझं कांहीं तरी झालंय आज. सांग ना, काय ग झालं ?

**मंदा** : ( खालीं मान घालते. तिला एक हुंदका येतो. )

**कालिंदी** : मने, असं काय ग ? काय ग बोल ना. मला नाहीं सांगणार तूं ?

**मंदा** : ( वर मान करून ) Raghu has left me !

**कालिंदी** : म्हणजे ? एकदम झालं काय ? तो इतकं तुझ्यावर प्रेम करतो आणि म्हणे he has left me !—मला नाहीं खरं वाटत.

**मंदा** : खरंच, he has left me.

**कालिंदी** : म्हणजे, तो दुसऱ्या कुणाशीं लग्न करतोय कीं काय ?

**मंदा** : नाहीं ग. मीच त्याला घालवलं.

**कालिंदी** : तूं त्याला घालवलंस ? आणि he has left you ? म्हणजे तूं बोलत्येस तरी काय आज, मंदा ?

**मंदा** : तो आजच्या आज या महिन्यांत आपण लग्न करून टाकूं म्हणून माझ्याकडून वचन मागूं लागला.

**कालिंदी** : मग ? त्यांत काय झालं ?

**मंदा** : तें कसं शक्य आहे ग, कालिंदी ? दादांना अशा स्थितींत टाकून मी लग्न कसं करूं ?

**कालिंदी** : अशा म्हणजे कशा ?

**मंदा** : त्यांचं ब्लड्प्रेशर वाढलं आहे ना अलिकडे. जरा त्रास झाला कीं छातींत दुखूं लागतं त्यांच्या.

**कालिंदी** : पण तूं लग्न केल्यामुळें काय होणार आहे ?

**मंदा** : त्यांना मी रघूशीं लग्न केलेलं मुळींच आवडत नाहीं.

**कालिंदी** : कां, काय झालंय रघूला ? चांगला लहानपणापासून तुमच्या घरांत येतो जातोय तो. हुषार आहे. एक चांगला तरुण आर्टिस्ट म्हणून जो तो स्तुति करतो त्याची—

**मंदा** : पण दादांना मुळींच आवडत नाहीं तो. तो आला कीं दादा अलिकडे अगदीं वाईट चेहरा करतात; म्हणून तोहि त्यांच्यावर चिडतो.

**कालिंदी** : दादांना आवडत नाहीं म्हणून तूं त्याला घालवून दिलंस ?

**मंदा** : नाहीं ग. तो दादांच्या संबंधीं वाटेल तसं बोलला.

**कालिंदी** : कां ?

**मंदा** : दादांना दुखवून मी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं, असं मी त्याला म्हटलं म्हणून. मी म्हटलं, आणखी थोडे दिवस थांब; मग बघूं. तो म्हणाला, छे, मला आजच्या आज जबाब पाहिजे. तेव्हां मी म्हटलं तुला अगदींच धीर निघत नसेल, तर कर दुसऱ्या कुणाशींहि लग्न ! तेव्हां चिडून वाटेल ते शब्द तो बोलला.

**कालिंदी** : तुझं तरी काय ग ? आणखी थोड्या दिवसांनीं दादांचं मत त्याच्याविषयीं बदलणार आहे होय ? आणि तो चिडला म्हणून तूं त्याला हांकलून लावलंस ?

**मंदा** : नुसता चिडला नाहीं ग. अगदीं कांहीं तरीच बोलला दादांविषयीं तो.

**कालिंदी** : काय एवढं बोलला तरी काय ?

**मंदा** : Oedipus—that notorious old fool अशी शिवी दिलीन् , इश्श !

**कालिंदी** : रागांत बोलला असेल. त्याला एवढं घालवून द्यायाला नको होतं कांहीं.

**मंदा** : मीहि खूप चिडलें. पण कालिंदी–( तिच्या अंगावर मान टाकते. तिला हुंदका येतो. )

**कालिंदी** : मंदा, तुझं त्याच्यावर प्रेम आहे तसं आहे. उगाच कां घालवलंस त्याला ?

**मंदा** : ( डोकें वर करून ) माझं त्याच्यावर खरंच प्रेम आहे. पण मी नाहीं दादांना या वयांत दुखवणार,–त्यानीं माझ्यासाठीं कित्ती कित्ती केलं आहे. मी जरा घरांत नसलें, तर त्यांना चैन पडत नाहीं. त्यांना तरी कोण आहे ग आतां ? त्यांनीं डोळ्यांत पाणी आणून मला सांगितलं, तेव्हां कुणाशींच लग्न करणार नाहीं, असं वचन मी दिलं त्यानां. त्यांना लोकांत किती मान आहे. माझ्यासाठीं त्यांना लोकांपुढें मान खालीं घालावी लागली, तर मेल्याहून मेलं होईल मला. आणि मी कांहींतरी त्यांच्या मनाविरुद्ध केलं, आणि त्यांना शॉक् बसून भलतंच कांहीं तरी झालं, तर ग ? नको ग बाई. मी अशी मरून गेलें तरी हरकत नाहीं,पण माझ्या दादांच्या नांवाला एवढासुद्धां कलंक—

( दारावर साध्या कपड्यांतला एक पोलीस येतो आणि खटखट करतो.)

**मंदा** : कोण पाहिजे ?

**पोलीस** : रावभाद्दूर कंकणकर हिकडे ऱ्हातात काय ?

**मंदा** : हो. तुम्ही कोण ?

**पोलीस** : मी दादर पोलीस कोर्टाचा पोलीस हाय, बाईसाहेब.

**मंदा** : काय काम आहे तुमचं ?

**पोलीस** : रावभाद्दूरांना एक समान् लावायचं हाय. हायत काय घरांत साहेब ?

**मंदा** : येतील आतां. डॉक्टरकडे गेले आहेत. बसा तुम्ही.

**पोलीस** : नाय् . तुमच्यासारख्यासमूर आंम्ही काय बसायचं, बाय; मी आपला हिकडेच उभा ऱ्हातो दारांत.

**मंदा** : कसलं समन्स आहे म्हणालांत, पोलीस कोर्टाचं ?

**पोलीस** : कसला, पोटगीचा दावा हाय म्हनतात. फिर्यादी कोन सीतबाय हाय.

**मंदा** : कोण सीताबाय ?

**पोलीस** : (समन्सवर डोळे फिरवीत ) सीताबाय—एं—गु—लें—क—र.

**कालिंदी** : ( मंदाकडे पाहून ) म्हणजे—दादासाहेबांवर सीताबाईचा पोटगीचा दावा ?

**पोलीस** : ( त्याला विचारलं नसतांना मोठ्या शहाणपणाचा आव आणून ) हा. ते कलम हायना नंबर चारसें अठ्ठ्याऐंसी !

( मंदा घेरी येऊन कोचावर कोसळते. कालिंदी तिच्याकडे धांवते. पोलीस बावळटासारखा चेहरा करून इकडे तिकडे पाहतो. )

# २

## बांदिवलीच्या मास्तरणी—

[ मुंबईला लागूनच असलेल्या बांदिवली उपनगरांमधील 'दक्षिणी कॉलनी'-तील एक घर. पहिल्या मजल्यावरच्या रस्त्याच्या बाजूलाच असलेल्या तीन खोल्यांच्या ब्लॉकमध्यें काशीताई ताम्हने रहातात. काशीताई कुणाला माहीत नाहींत ? मुलींच्या शाळेंत त्या मुख्याध्यापिका असून 'दक्षिणी कॉलनी'तील 'महिलासमाजा'च्या त्या एक प्रमुख कार्यकर्त्या आहेत. बी. ए. झाल्यावर विवाह न करतां समाजसेवेला त्यांनी वाहून घेतलें आहे. त्यांची फार माहिती द्यायला नकोच. त्यांच्या दिवाणखान्यांतील वस्तूंची मांडणी, तेथील शेल्फवर असलेल्या पुस्तकांचीं नांवें आणि भिंतीवरील तसबिरा पाहूनच त्यांच्या उच्च आयुष्यक्रमाची कल्पना येण्यासारखी आहे. टेबलावर आणि खुर्च्यांवर स्वच्छ खादीचें कापड अंथरलेलें आहे. शेल्फवरील पुस्तकांत स्माईल्सचें 'Character,'एला व्हीलर विल्कॉक्सच्या कविता, टिळकांचें गीतारहस्य, महात्मा गांधींचें आत्मचरित्र, इत्यादि पुस्तकें प्रामुख्यानें दिसत आहेत. प्रो. फडके यांच्या कादंबऱ्या किंवा प्रि. अत्रे यांचीं नाटकें, यांना निदान या शेल्फवर तरी जागा नाहीं. भिंतीवर

स्वामी विवेकानंद, ॲनी बिझांट, महात्मा गांधी, इत्यादिकांच्या तसबिरा योग्य अंतरावर लावलेल्या आहेत.

दिवाणखान्याला लागूनच असलेली लहानशी गॅलरी आणि दिवाणखाना यांच्यामध्यें चित्रविचित्र फुलें असलेला एक रंगीत खादीचा पडदा सोडलेला आहे.

या क्षणाला याच पडद्याच्या मागें उभ्या राहून रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्यांकडे काशीताई पहात आहेत. त्यांना सर्व दिसतें आहे, पण आपण मात्र रस्त्यावरून कुणाला दिसणार नाहीं याची त्यांनीं काळजी घेतली आहे. आज रविवारची दुपार असल्यामुळें वेळ मोकळाच आहे. आणि नसला तरी बाहेर काय चाललें आहे आणि काय नाहीं याकडे पहात थोडा वेळ त्या उभ्या राहिल्या तर त्यांत कांहीं मोठसं नवल नाहीं. त्यांचं वय कांहीं तसं फार नाहीं. असेल फार तर बत्तीस आणि छत्तीसाच्या दरम्यान.

दारावर 'टक्' 'टक्' आवाज होतो. त्यासरशीं दचकुन काशीताई दिवाणखान्यांत परत येतात, आणि टेबलावर पडलेलें शिवणाचें काम हातांत घेऊन दरवाजा उघडावयाला जातात. दरवाजा उघडतांच कु. पिलूताई सप्तर्षि, वय वर्षें बत्तीस, धंदा मास्तरीण–उंच आणि किडकिडीत–आंत येतात.]

**काशीताई** : बरं झालं आलात त्या, पिलूताई. कसा तो मेला वेळच जात नव्हता आज.

**पिलूताई** : हात्तिच्या ! मी म्हणत होते इतक्या लवकर तुमच्याकडे जावं कीं नाहीं. हो, तुम्ही कांहीं तरी कामांत असायच्या आणि मी मध्येंच आलें म्हणजे त्रास व्हायचा तुम्हांला.

**काशीताई** : छेः, काम कसलं आलं आहे. आपल्या 'महिलासमाजा'तर्फे 'बेबी वीक' व्हायचा आहे ना? त्यासाठीं हीं थोडीशीं झबलीं आणि टोपरीं शिवून ठेवतें आहे.

**पिलूताई** : तुमच्या उद्योगीपणाची कमाल आहे, बाई. या बांदिवलीच्या बायकांसाठीं तुम्ही किती खपतां. नाहीं तर दुसऱ्या बायका !

जरा वेळ असला कीं, गॅलरींत उभ्या राहून रस्त्यावरून कोण जातं आहे, नी कोण नाहीं; कोण कसलं लुगडं नेसली आहे नी कोण कुणाबरोबर जाते आहे, तं पहात बसतील !

**काशीताई** : ( किंचित् दचकून ) मला नाहीं बाई आवडत गॅलरींतून बाहेर पहात उभं राहणं !

**पिलूताई** : मला सुद्धां नाहीं आवडत. मला नेहमी हाच प्रश्न पडतो, कीं या बायकांना मिळतं काय दुसऱ्यांच्या उठाठेवी करून ! कोण कुठे जातं आहे, आणि कोण काय करतंय हें समजून करायचंय काय यांनां ?

**काशीताई** : मीहि तेंच म्हणते. पण हेंही पाह्यलं पाहिजे, पिलुताई. अशिक्षित आणि अडाणी त्या. दुसरं तरी काय करणार ?

**पिलूताई** : दुसरं काय करणार ! कांहीं करावं मेलं ! पण हें काय ? अमकी तमुक करते, तमकी त्याच्याबरोबर फिरते ! मला कुणी सांगायला लागल्या या गोष्टी, की मी अस्सा चेहरा करतें कीं तोंडांत मारल्यासारख्या गप्पच बसतात. एक शब्द बोलत नाहीं मी, पण नुसता चेहेरा बघूनच समजतात त्या.

**काशीताई** : तुम्ही आहांच खमक्या, पिलुताई.

**पिलूताई** : खमक्या म्हणजे ! मी कांहीं पुण्यामुंबईची नाहीं. आपलं भडभडा बोललं कीं झालं. मी आहे नागपूरची. एकदां अशा तऱ्हेनें पहातें कीं तेवढ्यावरच समजावं लोकांनीं. पुढें बोलायची काय बिशाद आहे त्यांची. आज सकाळीं गंगूताईनां हेंच सांगत होतें मी.

**काशीताई** : भेटल्या होत्या वाटतं तुम्हाला आज गंगूताई ?

**पिलूताई** : नाहीं. खिडकींतून रस्त्यावर पहात मी उभी होतें तों समोरच्याच कापडाच्या दुकानांतून बाहेर पडतांना गंगूताई आणि त्यांची बहीण गुलुताई दिसल्या. मी बोलावलं त्यांना वर.

**काशीताई** : बऱ्या आहेत ना त्या आतां ?

**पिलूताई** : तशा बऱ्या आहेत. पण काल त्यानीं जें पाह्यलं तें पाहून त्यांना धक्काच बसला. काय बाई एक एक तरी !

**काशीताई** : म्हणजे ! काय झालं काय ?

**पिलूताई** : मला लाज वाटते, बाई, तुम्हाला सांगायला. तुमच्या सारख्या शुद्ध मनाच्या माणसाला खरं सुद्धां वाटायचं नाहीं तें. जाउं द्या मेलं. पण आमच्या ' महिला समाजा 'च्या एका सभासद बाईनं आणि आमची ' मैत्रिण ' ' मैत्रिण ' म्हणून मिरवणाऱ्या–

**काशीताई** : कुणी काय केलं ? चट्दिशीं बोला कीं–

**पिलुताई** : कसं सांगावं तुम्हाला ! पण माझा इलाज नाहीं. ' महिलासमाजा'च्या तुम्ही प्रमुख कार्यकर्त्या आहां. तुम्हाला कळलंच पाहिजे. गंगूताईनीं मला पहिल्यांदा सांगितलं तेव्हां माझा विश्वासच बसेना. पण त्यानीं प्रत्यक्ष डोळ्यांनीं—

**काशीताई** : एकदम बोलून टाका, पिलूताई; मला धीर धरवत नाहीं आतां.

**पिलूताई** : आपल्या बांदिवलीच्या दक्षिणी कॉलनींत असं व्हावं ! आणि असली बाई आपल्या 'महिला समाजा'च्या कार्यकारी मंडळांत–

**काशीताई** : ( जवळ जवळ चिडून ) पिलूताई, एकदम नांव सांगा बघू.

**पिलूताई** : माझा इलाज नाहीं. सांगतेच तर मग. सत्य कटू असलं तरी तें सांगितलंच पाहिजे. आपल्या—आपल्या—

[ तें कटु सत्य काशीताईंच्या कानांवर पडणार, इतक्यांत दारावर 'टक्' 'टक्' आवाज होतो. काशीताई दार उघडतात. गंगुताई आणि गुलुताई आंत येतात. श्रीमती गंगुताई भारद्वाज, वय वर्षें एकुणचाळीस, चेहऱ्यावर आणि कपड्यालत्त्यांवर संन्यासी वृत्तीची छटा. पोलक्याचे हात कोंपरापर्यंत लांब. गेल्या पंधरा वर्षांत बांदिवलींतल्या स्त्रियांच्या दोन पिढ्या यांच्या हाताखालीं शिकून तयार झाल्या आहेत. त्यांची बहीण गुलुताई, वय वर्षें एकतीस, जी.ए.,मास्तरीण.]

**गंगूताई** : पिलुताई, तुम्ही इथेंच आहांत का ?

**पिलूताई** : ही आत्तांच आले.

**काशीताई** : या बाजूला बसाना अशा, गुलुताई.

**गुलूताई** : बरं आहे इथं.

**गंगूताई** : पिलुताई मी सकाळीं सांगितलेलं तुम्ही सांगितलंच असेल काशीताईंना ?

**गुलूताई** : भयंकरच आहे एकंदर प्रकार तो !

**गंगूताई** : गुले, मला बोलूं देशील का ?

**गुलूताई** : ( नरमून ) बरं, आक्का.

**पिलूताई** : मी त्यांना सांगणार होतें, इतक्यांत तुम्ही आलांत.

**काशीताई** : तुम्हीच सांगा, गंगुताई.

**गंगूताई** : ठीक आहे. तुम्हाला सांगणं आणि या प्रकाराचा तुमच्याकडून निकाल लावून घेणं, हें माझं कर्तव्यच आहे. आपल्या 'महिलासमाजां'त असली चारित्र्यहीन बाई आपण घेणं, इतकंच नव्हे तर आपली मैत्रीण म्हणून आपण जाऊं तिथें तिला आपल्या बरोबर नेणं म्हणजे आपण होऊन आपल्या तोंडाला काळं फांसण्यासारखं आहे.

**गुलुताई** : कांहीं झालं तरी आपल्या 'महिलासमाजां'त अब्रूदार बाया आहेत.

**गंगूताई** : गुले ! तूं बोलू नकोस मध्यें.

**गुलूताई** : ( नरमून ) बरं, आक्का.

**गंगूताई** : बरं का, काशीताई.

**काशीताई** : सगळं कांहीं सांगा. कांहीं असलं तरी ऐकायची तयारी आहे माझी.

**गंगूताई** : काल संध्याकाळीं मी आपली सहज खिडकींत उभीं होतें. आमच्या समोरच तो 'नेहरू पार्क' आहे ना ? दुसरं कांहीं पहात नव्हतें मीं. त्या माळ्यानं नुकतींच विलायती फुलांचीं नवीन झाडं लावलीं आहेत, तीं पहात होतें. असेल साडेसहा–सातचा सुमार.

**गुलुताई** : मला वाटतं पावणेसात झाले होते.

**गंगूताई** : गुले ! मी बोलतें आहे.

**गुलूताई** : ( नरमून ) बरं, आक्का.

**गंगूताई** : त्या पार्कच्या पलीकडल्या बाजूला तें लहानसं गेट आहे ना ? त्यांतून तीं दोघं हातांत हात घालून बाहेर पडून पलीकडे गेलीं. तो तांबडा टोप पदर मी ताबडतोब ओळखला.

**काशीताई** : कुणाचा ?

**पिलूताई** : हल्लीं तांबड्या टोप पदराचीं लुगडीं कोण नेसताहेत कॉलनींत ?

**काशीताई** : छे:, कुणीच नाहीं. जुन्या तऱ्हेचीं तीं इलकलीं लुगडीं हल्लीं तरी कुणी नेसत नाहींत.

**पिलूताई** : पण ' मला बाइ तांबडा टोप पदर आवडतो. फॅशन असो अगर नसो मी इलकली लुगडं घेणारच ' असं म्हणून गेल्याच आठवड्यांत ते भडक तांबड्या पदराचं लुगडं कुणी घेतलं तुम्हाला आठवत नाहीं वाटतं ?

**काशीताई** : ( त्यांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडतो ) अग बाई ! सुमित्राबाई पावशे कां त्या ?

**गंगूताई** : दुसरं कोण ? आणि तो मेला अगदींच ड्रायव्हरसारखा दिसत होता कुणी तरी !

**काशीताई** : कांहीं तरीच, गंगुताई.

**गंगूताई** : कांहीं तरीच काय ? प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाह्यलं आहे मी.

**गुलूताई** : अक्का म्हणाली तेव्हां मी सुद्धां खिडकींत येऊन—

**गंगूताई** : गुले, तूं मध्यें मध्यें—

**गुलूताई** : ( नरमून ) बरं, आक्का.

**काशीताई** : हातांत हात घातला नसेल त्यानीं !

**गंगूताई** : आतां काय सांगूं तुम्हांला ?

**काशीताई** : पण, पण–

**गंगूताई** : पण काय ? मला पहिल्यापासून माहीत होतं. ती आणि तिची आई इथं राहायला आली तेव्हां मला ती सांगत होती, कीं अमक्यांशीं माझं नातं आहे नी पुण्याचे तमके सरदार माझे चुलते लागतात ! कांहीं नाहीं ! अशीच कांहींतरी भानगड आहे म्हणे त्यांच्या कुटुंबाची !

**पिलूताई** : त्यांची घरची रहाणीच पहा कीं. म्हणे सरदारांचे नातेवाईक आम्ही !

**काशीताई** : भानगड म्हणजे--

**गंगूताई** : तस कांहीं मला माहित नाहीं, पण लोक म्हणतात.

**पिलूताई** : लोक म्हणायला कशाला हवेत ? तिचं तें दोन बाजूला मुद्दाम बटा सोडून केंस विचरणं, इतरांपेक्षां निराळ्याच तऱ्हेचे कपडे करणं, चालतांना उगाच इकडे तिकडे पहाणं, हेंच पुरे आहे कीं तिची चालचलणुक सिद्ध करायला.

**काशीताई** : आणि ते ब्लाऊझ तरी कसल्या प्रकारचे वापरते ! कीं पुरुषांनीं हटकून वळून पाहिल्याशिवाय राहू नये.

**गंगूताई** : दिवसे दिवस हें असंच चालायचं, पण तुम्ही आम्ही यापुढें तिच्याशीं संबंध ठेवणं म्हणजे—

**काशीताई** : मग करायचं काय ?

**गंगूताई** : आपण तिला स्पष्ट कळवलं पाहिजे. कांहीं झालं तरी बांदिवलींतल्या बायकांत आपणाला मान आहे.

**पिलूताई** : आणि काशीताई, 'महिला समाजा'च्या प्रमुख म्हणून तुमच्यावर विषेश जबाबदारी आहे.

**काशीताई** : मला बाई, कांहीं सुचत नाहीं. आपण करायचं तरी काय ! सर्व बायका तिला आपली मैत्रीण समजतात. असं कांहीं असेल, अशी मला कल्पनाही नव्हती.

**पिलूताई** : असं कांहीं करण्यापेक्षां लहानपणींच लग्न करून सरळ संसार करायला काय होतं या बायकांना ?

**गुलूताई** : करतो कोण लग्न तिच्याशीं !

**गंगूताई** : लग्न होत नाहीं म्हणून तर मास्तरीण झाली आहे. दुसरं काय ? मांगतात मोठमोठ्या समाजसेवेच्या आणि देशभक्तीच्या गोष्टी, पण बहुतेक बायांच असंच असतं !

**काशीताई** : नेहमीं असंच असतं असं नाहीं कांहीं. मी बी. ए. झालें तेव्हां आय. सी. एसच्या दोन मागण्या होत्या मला, पण मी लहानपणींच ठरवलं होतं.

**पिलूताई** : तुम्हाला माहीत आहे का गंगुताई ? पुण्याचे आज ते मोठे प्रसिद्ध डॉक्टर आहेत ना शिरवाडकर, एफ. आर. सी. एस. ? ते पास होऊन आले तेव्हां धरणं धरून बसले होते आमच्या बाबांच्या-कडें माझ्यासाठीं. पण मला पुरुषांचा पहिल्यापासून तिटकारा. बाबांनीं परोपरीनं मला सांगितलं, पण नाहीं म्हणजे नाहीं ! त्यांनीं मला पत्र सुद्धां धाडलीं तेव्हां एकदां भेटायला बोलावलं त्यानां. बिचारे धांवत आले. जास्त कांहीं बोललें नाहीं, पण अस्सा चेहेरा करून पाह्यलंय त्यांच्याकडे मी, कीं पुन्हां नांव काढलं नाहीं त्यांनीं माझं.

**काशीताई** : तुम्ही आहांच खमक्या, पिलूताई.

**गुलूताई** : ते कॉलनींतले राजवाडे डॉक्टर तर माझ्याकडे अजून—

**गंगूताई** : गुले ! तुला काय सांगितलं आहे मी ?

**गुलूताई** : ( नरमून ) बरं आक्का.

**गंगूताई** : माझं म्हणणं तसंच होतं, काशीताई, कीं बहुतेक बढाई मारणाऱ्या बायकांचं असं असतं. आपली गोष्ट वेगळी !

**पिलूताई** : म्हणूनच तुम्हांआम्हांला यापुढें सुमित्राताता—पावशे-बाईशीं कसल्याही प्रकारचा संबंध ठेवतां येत नाहीं.

**काशीताई** : आपण काय करायचं तें एकदां नक्की ठरवूं या.

**पिलूताई** : ठरवायचं काय? तुमच्याकडेच त्या फार येतात. त्या पुन्हां आल्या कीं त्यांना स्पष्ट सांगा, कीं तुझ्यासारख्या बाईशीं आम्हीं संबंध ठेवूं इच्छित नाहीं. आमच्या घराचीं दारं तुला बंद—

[ दारावर ' टक् टक् ' आवाज होतो. सगळ्या जणीं दाराकडे पहातात. काशीताई दार उघडतात. सुमित्राताई पावशे आंत येतात. काशीताई भूत पाहिल्यासारख्या दचकून ' च् च् ' करीत मागें येतात. गंगूताई ओंठ चावून, उग्र चेहरा करून काशीताईकडे पहातात. पिलूताई ' अस्सा ' चेहरा करतात, कीं पावशेबाईला सर्व कांहीं समजावें; पण पावशेबाईंना कांहींच समजत नाहीं! गुलूताई बावरल्यासारख्या होतात. कु. सुमित्राताई पावशे, वय वर्षें तीस, दिसावयाला तिथें बसलेल्या इतर मास्तरणींपेक्षां किंचित् देखण्या. कांहींतरी सांगण्यासारखे तोंडांत मावत नसल्यामुळें त्यांची इतकी धांदल उडाली आहे कीं इतर ' ताई'नीं आपलें नेहमीप्रमाणें स्वागत केलें नाहीं, ही गोष्ट त्यांच्या ध्यानांतसुद्धां आलेली नाहीं. घामाघुम झालेला चेहेरा हातरुमालानें पुशीत त्या खालीं बसतात. आणि एकदम बोलावयाला सुरुवात करतात. ]

**सुमित्राताई** : तुम्हाला केव्हां सांगेन असं मला झालं आहे. मला कल्पना नव्हती, तुम्हीं सगळ्या इकडे भेटाल म्हणून.

**इतर ताई** : ( आपला निश्चय विसरून ) काय—काय तें ?

**सुमित्राताई** : आमची नवी मोलकरीण ती सरू--काशीताईंनींच तिची शिफारस केली होती. अर्थात्, तुम्हाला दोष देत नाहीं मी, काशीताई.

**काशीताई** : मला आणि दोष ! कसला ?

**पिलूताई** : झालं काय त्या सरूचं ?

**सुमित्राताई** : तिला आजच्या आज काढून टाकावी लागली आम्हांला. काशीताईंनीं दिली म्हणून एकदां गय करावी, असं आई

म्हणत होती. पण मी निश्चयच केला होता तिला हांकलून द्यायचा. काशीताईंना म्हटलं. मी सांगेन सगळं.

**गंगूताई** : असं केलं तरी काय तिनं ?

**सुमित्राताई** : केलं काय ?——अहो त्या शेजारच्या डॉक्टरांचा ड्रायव्हर आहेना ? त्याच्याशीं म्हणे तिनं दोस्ती केली होतनि्. मला कांहींच माहीत नव्हतं इतके दिवस. काल दुपारीं मी नी आई गेलों होतों मुंबईला. आम्ही लवकर परत येणार नव्हतों संध्याकाळीं, पण ज्यांच्याकडे गेलों ती मंडळी भेटलीच नाहीं. तेव्हां लवकर परत आलों तों काय ?

**काशीताई** : काय ?

**पिलूताई** : काय झालं ?

**सुमित्राबाई** : अहो माझं नवं तांबड्या टोप पदराचं लुगडं नेसून ती कारटी त्या ड्रायव्हरबरोबर फिरायला गेली होती नेहरू पार्कमध्यें ! कितीतरी जणांनीं तिला पाहिली म्हणे. अलीकडे आपल्या कॉलनींत टोप पदराचीं लुगडीं कुणीच वापरीत नाहीं; लांबून पहाणारांना ती मीच कीं काय असा संशय आला ! इश्श !!

**गंगूताई** : कमाल झाली बाई आतां ?

**पिलूताई** : तशी कांहीं दिसत नव्हती बाई पोर ती. बाकी, लोकांना तुमचा संशय यावा म्हणजे खूपच झालं !

**सुमित्राताई** : अहो लोकांनां काय ?—कांहीं तरी कुटाळकी करायला पाहिजे ना ? सगळींच माणसं तुमच्यासारखी शुद्ध मनाचीं थोडींच असतात ?

**काशीताई** : तुम्ही किती घामाघुम झालां आहांत, सुमित्राताई ! तुमचे केंससुद्धां विस्कटलेत.

**पिलूताई** : विस्कटलेल्या केंसाच्याच त्या दोन बटा छान शोभतात तुम्हाला, सुमित्राताई !

**गुलूताई** : इतर कांहीं म्हणोत, पण टोप पदराचंच लुगडं तुम्हाला चांगलं दिसंत सुमित्राताई !

**सुमित्राताई** : चला, उगाच कांहीं तरी ! माझी थट्टा करतां वाटतं ? जातें बाई आतां. बराच उशीर झाला.

**काशीताई** : बसा हो, सुमित्राताई. उद्यां सुट्टीच आहे. तेव्हां उद्यां सकाळीं तुम्ही सगळ्या माझ्याकडेच जेवायला या. कंटाळा येतो एकटं बसून मेलं जेवायला. मग ? याल ना सुमित्राताई ? आणि तुम्ही सुद्धां, गंगुताई.

**गंगूताई** : मी आलें असतें; पण उद्यां सकाळीं मुंबईला जाऊन डोळे तपासून घ्यायचे आहेत मला डॉ. सरदेसायांकडून.

## ३

# बांदिवलींत डॉक्टर—

[ मुंबईजवळच्या बांदिवली उपनगरांतल्या ' दक्षिणी कॉलनीं 'तील दोन खोल्यांचा एक ब्लॉक. कु. पिलूताई सप्तर्षि,–उंच आणि किडकिडीत, वय वर्षे बत्तीस, धंदा मास्तरीण,–दिवाणखान्यांतल्या कॉटरवर बसल्या आहेत. लैंगिक विषयांना वाहिलेल्या 'समाजस्वास्थ्य' मासिकाचा ताजा अंक वाचण्यांत त्या गढून गेल्या आहेत.

दुपारीं चार–साडेचारची वेळ आहे. दारावर टक् टक् आवाज होतो. एकदम चमकून पिलूताई भानावर येतात, आणि हातांतले ' समाजस्वास्थ्य ' झटकन् टेबलाच्या खणांत लपवून ठेवतात. टेबलावरलें ' नीतिशास्त्रप्रवेश ' हें पुस्तक हातांत घेऊन त्या दरवाजा उघडावयाला जातात.

कु. काशीताई ताम्हने, बी. ए.,–वय बत्तीस छत्तीसाच्या दरम्यान, मुलींच्या शाळेच्या मुख्याध्यापिका,–आंत येतात. त्यांच्या हातांत औषधाची रिकामी बाटली आहे. ]

**काशीताई** : ( पिलूताईच्या हातांतलें पुस्तक पाहून ) अग बाई ! पिलूताई, तुमचा कांहीं विशेष अभ्यास चालला होता वाटतं ? डॉक्टर

अजून दवाखान्यांत आले नाहींत म्हणून मी आपली सहज इकडे वळलें. काल पुण्याला गेलेत ते अजून आले नाहींत म्हणे.

**पिलूताई** : छे, छे, बसा तुम्ही. तसं कांहीं विशेष नाहीं हो. उद्या त्या मुलींच्या शाळेंत 'आधुनिक स्त्रियांची नैतिक अधोगती' या विषयावर मला बोलायचं आहे ना ? म्हणून प्रो. जोशांचं हें 'नीतिशास्त्र प्रवेश' आपलं चाळीत होतें.

**काशीताई** : 'नैतिक अधोगती' नाहीं तर काय ?—तुम्ही आम्हीं हीं पुस्तकं वाचतों—पण अलीकडच्या या मुली 'नीतिशास्त्रप्रवेश' नी 'विचार—विलास' हीं पुस्तकं टेबलावर ठेवावयालासुद्धां तयार नाहींत.—परवां एकां मुलींच्या घरीं मीं गेले होते—तिच्या टेबलावर अगदीं उघड्यावर टाकलेलं एक मासिक होतं—काय असेल तुम्हांला वाटतं ?

**पिलूताई :** कांहीं कल्पना होत नाहीं, बाई.

**काशीताई** : त्या कर्व्यांचं 'समाजस्वास्थ्य' मासिक !

**पिलूताई** : ( दचकून ) खरंच !

**काशीताई** : अहो खरं म्हणजे—कव्हरावर तो नागव्या स्त्रीचा फोटो—आणि तिनं तें तस्सं टेबलावर टाकलं होतं !

**पिलूताई** : कमाल आहे बाई, अलिकडल्या मुलामुलींची !—परवां मी मुंबईहून परत येत होतें. ट्राम्‌मध्यें माझ्या शेजारींच एक कॉलेज-मधला मुलगा येऊन बसला—उघड्या नागड्या स्त्रीपुरुषांचीं चित्रं असलेलें कसलं ते 'फिजिकल कल्चर' कीं काय मासिक सताड उघडून माझ्यासमोर वाचू लागला—मी त्या मासिकाकडे ढुंकूनसुद्धां पाह्यलं नाहीं—पण त्यानं वर नजर केल्याबरोबर त्याच्याकडे अस्सा चेहरा

करून मी पाह्यलं कीं, दचकून तो एकदम उठला नी दुसऱ्या बाकावर जाऊन बसला!

**काशीताई** : तुम्ही आहांच तशा खमक्या, पिलूताई.

**पिलूताई** : खमक्या म्हणजे—मी कांहीं तुमच्यासारखी पुण्या-मुंबईची नाही—मी आहे नागपूरची—मी असले चाळे बघून गप्प बसणार नाहीं—अश्शी पाहातें—तुमच्यासारखी त्या मुलीकडे गेलें असतें तर त्या टेबलावरच्या त्या ' समाजस्वास्थ्य ' मासिकांच्या तिथल्या तिथं चिंधड्या करून टाकल्या असत्या—हो!

**काशीताई** : त्या मासिकाच्या चिंधड्या आपण करूं,—पण त्या मासिकाचे प्रत्यक्ष संपादक आपल्या ' महिलासमाजांत ' या शनिवारीं व्याख्यान द्यायला येणार आहेत, हें तुम्हांला कळलं कां?

**पिलूताई** : काय, म्हणतां काय? तो भयंकर माणूस आपल्या ' महिला समाजां'त येणार?

**काशीताई** : हल्ली मॅनेजिंग कमिटींत सर्व नव्या पोरी भरल्यात ना—त्याचा हा परिणाम. तुम्ही हजर नव्हतां त्या दिवसाच्या सभेला—

**पिलूताई** : हजर असतें तर एकेकीकडे अश्श्या नजरेनें पाह्यलं असतं कीं त्यांची बिशाद नव्हती असं कांहीं करायची!

**काशीताई** : अहो, आपलंच नाणं खोटं तिथं दुसऱ्यांना काय दोष द्यायचा?

**पिलूताई** : म्हणजे?

**काशीताई** : बाकीच्या बायका सगळ्या तशाच, त्यांच्या बहु-मतानं तो ठराव पास झाला त्यांत कांहीं मोठंसं नाहीं. पण गुलूताई

आमच्या ना ?–त्यांनीं त्या ठरावाला जोरानं पाठिंबा दिला–माझ्याकडे पहातसुद्धां नव्हत्या.

**पिलूताई** : गंगूताई नव्हत्या वाटतं ?

**काशीताई** : अहो गंगूताई असल्या तरी त्यांनींहि गुलुताईकडे काणाडोळाच केला असतां.–हल्लीं काय चाललं आहे तें तुम्हाला माहिती नाहीं, पिलूताई.

**पिलूताई** : नाहीं, बाई. मला कांहीं कल्पनाच नाहीं.

**काशीताई** : आपली चांगली जुनी जागा सोडून गुलुताईला घेऊन तुमच्यासमोर गंगूताई कशाला रहायला आल्यात वाटतं ?

**पिलूताई** : ही जागा चांगली हवाशीर, स्वस्त नी मोठी आहे, आणि आपली तुमच्या जवळच आहे म्हणून आलें असं गंगूताई म्हणत होत्या.

**काशीताई** : हो तर ! तुमच्याबद्दलचं त्यांचं प्रेम आतांच कां एकदम उतू जाऊं लागलं ? मागें तुमच्या शेजारचा ब्लॉक रिकामा झाला होता तेव्हां तुम्ही आग्रह करीत होतां तरी आल्या नाहींत. नी आतां समोरच्या घरांत एकदम तुमच्यासाठीं रहायला आल्या !

**पिलूताई** : तुमचं म्हणणं तरी काय, काशीताई ?

**काशीताई** : आमचे डॉक्टर राजवाडे तुमच्यासमोर रहायला आलेत ना ? तेव्हां त्यांच्या शेजारचा ब्लॉक रिकामा झाल्याबरोबर गंगूताईंनीं झडप घातली.

**पिलूताई** : म्हणजे ?

**काशीताई** : म्हणजे अगदीं सोपं आहे ! डॉक्टर राजवाडे एकटेच आहेत, तरुण आहेत, दिसायला चांगले आहेत, हुषार आहेत, भरपूर पैसा आहे——

**पिलूताई** : इश्श ! काशीताई !

**काशीताई** : तेव्हां गुलुताईचं त्यांच्याशीं जमवायला पहाताहेत गंगूताई !

**पिलूताई** : कांहीं तरीच ! गुलूताई लग्न करतील ?--आणि त्या एक वेळ करायला तयार झाल्या तरी गंगूताई त्यांना करूं देतील ? कुणी लग्नांचं नांव काढलं कीं गुलूताई 'इश्श' म्हणून नाक मुरडतात नी गंगूताई एवढाले डोळे करतात !

**काशीताई** : तें तसंच आहे. दुसऱ्यांनीं लग्नाचं नांव काढलं तर 'इश्श' 'इश्श' करायचं, आणि आंतून कुठं ना कुठं तरी आपलं जमवीत रहायचं ! सगळ्याच तुमच्या आमच्या सारख्या नसतात, पिलूताई !

**पिलूताई** : असेल, बाई. पण मला नाहीं खरं वाटत.

**काशीताई** : अगदीं खर आहे. मी पहातें ना. केव्हांही जा डॉक्टर-कडे, गुलूताई आपल्या तिथं बसलेल्या आहेतच. 'समाज-स्वास्थ्या'चे संपादक डॉक्टरांचे मित्र आहेत असं कुठं उडत उडत गुलूताईनीं ऐकलं होतं; तेव्हां डॉक्टरांनां कांहींना कांहीं तरी करून खूष करायचं म्हणून त्यांना 'महिला समाजांत' बोलावण्यांत गुलूताई सर्व बायकांच्या पुढें !

**पिलूताई** : मला बाई, कांहीं तुमचा तो डॉक्टर राजवाडे चांगला माणूस वाटत नाहीं. सकाळसंध्याकाळ मी बघतें त्याला खिडकीतून—बघावं तेव्हां बायकांची गर्दी त्याच्या दवाखान्यांत असते !

**काशीताई** : छे हो, पिलूताई. डॉक्टर किनई फारच चांगले माणूस आहेत—या बायकाच फाजील आहेत, त्याला ते काय करणार ?

**पिलूताई** : तें कांहींही असो, एकदा त्यांनीं वर माझ्याकडे पाह्यलं, तेव्हां मी अस्सा चेहेरा केला कीं, एकदम खालीं मान घालून ते जे दवाखान्यांत गेले, ते पुन्हां कध्धीं आतां वर मान करून पहात नाहींत !

**काशीताई** : ते तसे मुळींच नाहींत. त्यानीं सहज वर पाह्यलं असेल. तुमच्याबद्दल माझ्याशीं बोलतांना ते नेहमीं आदरानं बोलतात. 'समोर रहाणाऱ्या बाई मोठ्या विद्वान् नी अभ्यासू दिसतात—नेहमीं कांहींना कांहीं तरी वाचीत असतात,' ते म्हणतात.

**पिलूताई** : कसलं आलं आहे वाचन ! त्यांना आपलं वाटलं असेल. बाकी अविवाहित असला तरी चालचलणुकीला मनुष्य चांगला दिसतो.

**काशीताई** : ते चांगलेच आहेत; पण या बायकाच त्यांना त्रास देतात. ही गुलूताईच पहा ना. सदान् कदा तिथं ठाण मांडून बसलेली असते. सुमित्राताई पावशे तशाच. औषध घ्यायचं तर रोज नवीन नवीन पातळं नी ब्लाऊज घालून कशाला यायला पाहिजे ?

**पिलूताई** : गुलूताईच्या हल्लीं छातींत धडधडतं नी मधून मधून फिट्स् येतात, म्हणून त्यानां डॉक्टरकडे नेहमीं जावं लागतं म्हणे ! कांहीं तरी स्पेशल ट्रीटमेंट् देताहेत म्हणे डॉक्टर.

**काशीताई** : कोण, गंगूताई सांगत होत्या वाटतं तुम्हाला ?

**पिलूताई** : हो.

**काशीताई** : गंगूताईच्याही छातींत धडधडलं असतं आणि मधून मधून फिट्स् आल्या असत्या. पण आतां चाळिशी उलटून गेली—करतात काय !

**पिलूताई** : कांहीं तरीच बोलतां तुम्ही, काशीताई !

**काशीताई** : कांहीं तरीच काय ? कसल्या फिट् नी कसलं धडधडणं ! दुपारी अकराबारा वाजतां दुसरे कुणी रोगी दवाखान्यांत नसले कीं गुलूताईच्या छातीत धड्धडायला लागतं, नी दवाखान्याकडे धांव घ्यावी लागते !

**पिलूताई** : इश्श ! काशीताई !

**काशीताई** : फिट्स्ही तशा नेमक्या वेळीं नी नेमक्या ठिकाणींच येतात ! आजूबाजूला कुणी नसलं कीं डॉक्टरांबरोबर बोलतां बोलतांच फिट् येते; आणि डोकं नेमकं डॉक्टरांच्या खांद्यावर पडतं !

**पिलूताई** : शक्य नाहीं—मला नाहीं खरं वाटत.

**काशीताई** : डॉक्टरच मला म्हणत होते—त्यांची मोठी विचित्र स्थिती झाली.—दोन तीनदां गुलूताईनां अशाच फिट्स् आल्या—त्यांना सावरून डॉक्टर कंपाऊंडरला बोलावतात तोंपर्यंत त्या शुद्धीवर आल्या—त्या सुमित्राबाईही तशाच—

**पिलूताई** : मला नाहीं बाई ऐकवत या असल्या गोष्टी—कुणी सांगायला लागलं, कीं नका सांगू म्हणून मी सांगतें—सुमित्राबाईचं काय म्हणत होता तुम्हीं ?

**काशीताई** : कांहीं नाहीं हो ! माझी कंबर दुखते म्हणून आलेकडे मी डॉक्टरांकडें रोज जाते ना ? तशीच त्या दिवशीं गेले होतें.

**पिलूताई** : तुमची कंबर अजून बरी नाहीं झाली वाटतं ?

**काशीताई** : तशी आतां थोडी बरी आहे. पण तें औषध कमरेला कसं लावायचं तेंच मला येत नव्हतं. मी म्हटलं तसं डॉक्टरनां. तेव्हां

त्यांनींच तें कमरेला चोळून दाखवलं. तेव्हांपासून थोडं बरं वाटतय्. डॉक्टरांच्या हातालाच कांहीं गुण आहे बघा, पिलूताई.

**पिलूताई** : हो पण—सुमित्राताईचं काय म्हणालात तें ?

**काशीताई** : तेंच सांगतें. औषध चोळून झाल्यावर कपडे नीट करून मी बाहेर पडले. डॉक्टरही कुठें मुंबईत त्यांना जायचं होतं म्हणून माझ्याबरोबरच बाहेर पडले—त्यांची ती छोटी टू सीटर गाडी दारांत उभी होतीच—इतक्यांत मारे झक्पक् पोषाख करून सुमित्राताई तिथं आल्या.

**पिलूताई** : कशाला ?

**काशीताई** : त्यांच्या आईला बरं नाहीं ना ? कांहींतरी निरोप सांगायचं निमित्त करून आल्या होत्या. डॉक्टर आपले मोटरकडे चालले होते. 'कुठं मुंबईला चाललांत वाटतं, डॉक्टर,' उगाच पुढं पुढें करीत सुमित्राईनीं डॉक्टरनां विचारलें. डॉक्टर 'हो' म्हणाले. तेव्हां 'मलाहि मुंबईला जायचं होतं,' असं स्वतःशीच त्या पुटपुटल्या. डॉक्टर काय करणार बिचारे ! 'चला तर माझ्या बरोबर' ते म्हणाले.

**पिलूताई** : गेली का मग ती त्यांच्या बरोबर ?

**काशीताई** : गेली म्हणजे—चांगली खेटून बसली मोटारींत त्यांच्या शेजारीं. जरा कोपऱ्यांत अंग सावरून बसायचं कीं नाहीं ? ही अगदीं खांद्याला खांदा भिडवून बसली.

**पिलूताई** : इतकी खेटून बसली नसेल ?

**काशीताई** : अहो काय सांगायचं—मुद्दाम त्या केंसाच्या बटा लोंबत ठेवते ना ?—त्या वाऱ्यानें डॉक्टरांच्या तोंडावर उडून त्यांना

त्रास होत होता—इतकी खेटून बसली होती—या बायकांना लाज कशी ती मुळींच नाहीं.—वर गॅलरींत उभ्या राहून गंगूताई नी गुलुताई खापरासारखा चेहरा करून हा सर्व प्रकार पहात होत्या. बाकी त्यांची बरी खोड मोडली ! ( घड्याळाकडे त्यांची नजर जाते ) अगबाई ! साडेचार वाजून गेले. डॉक्टर आले असतील दवाखान्यांत—मोटारनें यायचे होते पुण्याहून म्हणून कंपाउन्डर सांगत होता—जातें मी, पिलूताई.

**पिलूताई** : बसा हो !

**काशीताई** : आतां नाही बसत. येतांना येईन मी वेळ झाला तर.

( काशीताई जातात. पिलूताई टेबलाचा खण उघडून आंत घाईघाईनें टाकलेला " समाजस्वास्थ्या " चा अंक इतर कागदाखालीं नीट लपवून ठेवतात, आणि टेबलाचा खण बंद करून त्याला किल्ली लावतात. इतक्यांत दार ठोकल्याचा आवाज येतो. त्या पुढें जाऊन दार उघडतात. कु. गंगूताई भारद्वाज–वय वर्षें एकुण चाळीस, आणि त्यांची बहीण गुलूताई. वय वर्षें एकतीस, जी. ए. मास्तरीण—आंत येतात. )

**पिलूताई** : अग बाई, तुम्ही !—काशीताई तुम्हाला वाटेंत भेटल्याच असतील ?

**गंगूताई** : नाहीं. खालच्या मजल्यावरच्या त्या बाईबरोबर बोलत आम्ही त्यांच्या घरांत थोडावेळ उभ्या होतों. तेवढ्यांत काशीताई तिथून गेल्या असतील—इतक्या लवकरशा गेल्या ?

**पिलूताई** : नाहीं—समोर डॉक्टरांच्याकडे जायचं होतं त्यानां—

**गंगूताई** : डॉक्टरांकडे त्यानां नेहमीच जायचं असतं !—डॉक्टर राजवाडे इथं राहायला आल्यापासून या सर्व जणींचे रोग एकदम वर आले आहेत !

**पिलूताई** : त्यांची कंबर फार दुखते म्हणे अलीकडे—राजवाड्यांच्या औषधानं जरा बरं वाटतंय म्हणाल्या.

**गंगूताई** : कसली कंबर नी कसलं काय ?—उगाच कांहींतरी फाजीलपणा करायचा ! कंबर दुखते तर दुसरी कुणी बाईडॉक्टर नाहीं मिळत यांनां दाखवायला ? पुरुषडॉक्टरच कंबर बरी करू शकतो कीं काय ?

**पिलूताई** : इश्श ! गंगूताई, काय बोलतां !

**गंगूताई** : अहो, 'इश्श' काय ?–बायकांनीं अलिकडे अगदीं ताळतंत्र सोडलय—

**गुलूताई** : सुमित्राताईंच्या खालींच एक लेडीडॉक्टर—

**गंगूताई** : गुले, तुला किती वेळां—

**गुलूताई** : ( नरमून ) नाहीं आक्का !

**गंगूताई** : मी तेंच सांगणार होतें. सुमित्राताईंच्या खालच्या मजल्यावरच ती बाईडॉक्टर आहे; पण त्यांच्या म्हाताऱ्या आईला जरा बरं वाटेनासं झालं कीं त्या राजवाड्यांच्याकडे धांवतात ! आमची गोष्ट वेगळी. खालींच राजवाड्यांचा दवाखाना आहे; तेव्हां आणखीं बाईडॉक्टर शोधीत गांवात कशाला फिरायचं ?

**गुलूताई** : आणि त्यांच्या औषधानं—

**गंगूताई** : गुले, तूं मध्यें मध्यें—

**गुलूताई** : बरं आहे, आक्का.

**गंगूताई** : त्यांच्या औषधानं खरंच गुलूच्या छातींतलं धडधडणं आतां किती तरी बरं आहे.

**पिलूताई** : अजून साफ बरं नाहीं का वाटलं ?

**गंगूताई** : वाटेल लवकरच. जागाहि चांगली हवेशीर आहे. तुमचा शेजारही आपला जवळ आहे. म्हणूनसुद्धां आम्हाला धीर वाटतो हो, पिलूताई.

**पिलूताई** : पण डॉक्टर अगदींच जवळ असल्यामुळें तुमची चांगलीच सोय झाली आहे.

**गुलूताई** : हो तर—वाटेल तेव्हां—

**गंगूताई** : गुले——

**गुलूताई** : नाहीं——

**गंगूताई** : बाकी डॉक्टर अगदीं लाख माणूस आहेत.

**पिलूताई** : बायकांच्या रोगांचा त्यांचा विशेष अभ्यास दिसतो.

**गंगूताई** : तसं कांहीं नाहीं—एकंदरींत ते हुषारच आहेत— पण या बायकाच त्यांच्यापुढे फार फाजीलपणा करतात—आतां या काशीताईच पहा ना—यांचं वय काय—

**गुलूताई** : डॉक्टरसुद्धां त्या दिवशीं म्हणत होते—

**पिलूताई** : काय ?

**गुलूताई** : अहो, त्यांनीं कांहीं औषध दिलं कमरेला चोळायला; तर या म्हणतात काय——तुम्हीच कसं तें चोळून दाखवा; मला नाहीं येत.

**पिलुताई** : इश्श !—पण डॉक्टरांनीं चोळून दाखवलं नसेल ?

**गुलूताई** : ते बिचारे करणार काय ?—या मुळीं त्यानीं दाखवल्या-शिवाय उठेचनात——मोठी विचित्र स्थिती झाली आपली, ते म्हणाले——

**गंगूताई** : गुले—

**गुलूताई** : खरंच आक्का, डॉक्टर मला अगदीं या शब्दांत सांगत होते.

**गंगूताई** : अहो, या बायकांनां बोलायला दुसरा विषयसुद्धां नाहीं. सुमित्राताईच्याकडे नाहींतर काशीताईकडे तुम्ही कधीं जा. बोलायचा विषय एकच—डॉक्टर अस्से आहेत—डॉक्टर तस्से आहेत—ते हुषार आहेत—त्यांच्या औषधाला गुण आहे—आणि या बायांना होत नाहीं कांहीसुद्धां—डॉक्टरांच्याकडे जायला निमित्त पाहिजे म्हणून यानीं हे रोग शोधून काढलेत !

**पिलूताई** : सर्वांना कांहींना कांहीं तरी अलिकडे व्हायला लागलंय—

**गंगूताई** : आमच्या गुलूच्या मात्र गेली दोन वर्षं छातींत धडधडतंय, नी फिट्स् येताहेत—

**पिलूताई** : गुलूताईंचं सोडा हो—पण या काशीताईंचं नी सुमित्राताईंचं म्हणतें—

[ दारावर टक्टक् आवाज येतो. पिलूताई दार उघडतात, काशीताई आंत येतात. ]

**पिलूताई** : कां हो काशीताई, इतक्या लवकर परत आलांत—तुमच्याच बद्दल बोलत होतों आम्ही.

**काशीताई** : डॉक्टर अजून आले नाहींत—काल मोटारनें पुण्याला गेलेत नी मोटारानेंच आज संध्याकाळीं परत यायचे होते, असं कांपाउण्डर म्हणाला. तिथं एकटचं बसायच—तें म्हटलें इथं यावं, नी मग परत जावं. गुलूताईंना माहित असेल केव्हां यायचेत तें.

**गंगूताई** : म्हणजे—तिला कसं माहित असणार, बाई ?—हें काय ?—

**काशीताई** : तसं नव्हे हो, गंगूताई. तुमच्या शेजारीच रहातात. म्हटल जातांना सांगून गेले असतील.

**गंगूताई** : मोटार निघते वेळेला सुमित्राताई होत्या तिथें. त्या बोलत होत्या कांहींतरी त्यांच्याशीं—

**काशीताई** : त्यांचं त्याच वेळेला पुण्याला कांहीं काम निघालं नाहीं वाटतं ?

**गुलूताई** : निघालं असतं—पण आई खरोखरच जरा ज्यास्त आजारी आहे.

**काशीताई** : तिथं नाक्यावर घाई घाईनं याच बाजूला येतांनां दिसल्या मला सुमित्राताई.

**पिलूताई** : डॉक्टरांच्याचकडे येत असतील.

**काशीताई** : डॉक्टर नाहींत तिथं—तेव्हां आतां इथंच येतील.

[ दार ठोकल्याचा आवाज. पिलूताई दार उघडतात. घामाघुम झालेल्या सुमित्राबाई पावशे-वय वर्षे तीस, इतर ताईपेक्षां किंचित् देखण्या,—आंत येतात. त्यांच्या हातांत ' ज्ञानप्रकाश'चा एक अंक आहे. ]

**गंगूताई** : सुमित्राताई, अशा घामाघुम कां तुम्ही ? काय, झालं काय ?

**सुमित्राताई** : (' ज्ञानप्रकाश ' दाखवीत) हें पाह्यलंत ?

**सर्व ताई** : काय ?

**सुमित्राताई** : हा डॉक्टरांचा आणि त्यांच्या बायकोचा फोटो. नी खालीं काय लिहिलय पहा !

**पिलूताई** : काय लिहिलय ?

**गंगूताई** : डॉक्टरांचा नी त्यांच्या बायकोचा फोटो ?—म्हणजे ?

**गुलूताई** : काय, आहे काय, सुमित्राताई ?

**सुमित्राताई** : काल त्यांनीं पुण्याच्या या डॉक्टरीणबाईशीं रजिस्टर पद्धतीनें लग्न केलं–आणि आज दुपारीं 'वधूवरें मोटारीने मुंबईस जावयास निघाली' असं 'ज्ञानप्रकाश' म्हणतो—

**काशीताई** : म्हणजे त्या कांपाऊण्डरलाही माहीत नाहीं ? काय बाई, माणूस तरी ?

**सुमित्राताई** : अहो, कांपाऊण्डरला हें दाखवून मी विचारलं तेव्हां तो सुद्धां माझ्यासारखाच आश्चर्यचकित झाला. पुण्याला आपली अशी कांहीं भानगड आहे, म्हणून गेल्या सहा महिन्यांत एका शब्दानें त्यांनीं दाद लागूं दिली नाहीं–काय लबाड माणूस तरी, बाई !

**पिलूताई** : मी पहिल्यापासून म्हणतेय, कीं तो माणूस कांहीं मला चांगला वाटत नाहीं. नेहमीं याच्याकडे स्त्रीरोग्यांची गर्दी का हो ?–पुरुषांना कांहीं रोग होत नाहींत ?

**गंगूताई** : तसा थोडा फाजीलच होता. पण मी म्हटलं तरुण आहे, हुशार आहे—

**काशीताई** : हुशार कसला कपाळाचा !—चार महिने माझी नुसती कंबर दुखते ती याला बरी करतां येत नाहीं—अलिकडे मला थोडं बरं वाटत होतं—पण तें याच्या औषधानें कांहीं नाहीं. मी रोज सकाळीं उठून फिरायला जातें म्हणून—

**गुलूताई** : तरी तुमचं बरं बाई–माझ्याशीं एकदां फारच फाजील-पणा केला त्यानं. तो तपाशीत असतांना मला एकदम घेरी आली. तेव्हां भिंतीला धरून मी स्वतःला सावरीत होतें—पण मी 'नको,

नको' म्हणत असतां माझ्या कमरेंभोंवतीं हात घालून त्यानं मला सावरलं—आतां बोलायंच काय ? डॉक्टरच पडला—

**गंगूताई** : गुले--

**गुलूताई** : अगदीं खरं आहे हें, आक्का. मी तुला सांगितलं नाहीं त्या वेळेला. मी म्हटलं तूं उगाच माझ्यावरच रागावशील--

**सुमित्राताई** : उगीच आपण पैसे घातले—आमच्या खालची ती बाईडॉक्टर इतकी चांगली आहे—पण आमच्या आईचा बाईडॉक्टरावर विश्वास नाहीं; म्हणून मी इकडे येत होतें. पण आतां मी आईचं मुळींच ऐकणार नाहीं !

**काशीताई** : भारीच निर्लज्ज माणूस !—मी घरीं लावीन म्हटलं औषध—तर म्हणे कमरेला कसं चोळायचं तें मी दाखवतों—

**गुलूताई** : अगदी खरं असेल. मला अनुभव आहे पुरा.

**गंगूताई** : सगळेच मेले पुरुषडॉक्टर असे—हा म्हटलं नवीन बरा असेल—पण तोहि त्यांतलाच निघाला—नी खाली दवाखान्याची घाण काय बाई !

**पिलूताई** : अहो, मला इथ्थं घाण येते !

**गंगूताई** : कपाळ उठतं माझं त्या आयडोफार्मनी नी त्या औषधांच्या वासानीं—इतकं भाडं भरून ही घाणेरडी जागा कशाला ठेवायची तेंच मला कळत नाहीं.

**गुलूताई** : या महिन्यालाच आपण नोटीस देऊं या आक्का.

**गंगूताई** : तेंच म्हणतें मी.—चला आतां—जाऊं या बाई.

**पिलूताई** : बसा, हो चहा तरी करू या.

# ४

## धूर—

### दृश्य १ लें.

[ लोणावळें येथील जमीनदाराचा बंगला. नाताळच्या सुट्टींत जमीनदारांचे मुंबई येथील मित्र—वकील, डॉक्टर व व्यापारी, जमीनदारांच्याकडे पाहुणे म्हणून आलेले आहेत. चौघेही मित्र आपापल्या धंद्यांत खूप पैसे मिळवून आहेत. संसारांतलीं सर्व सुखें प्रत्येकाला विपुल आहेत; पण फक्त एका सुखासाठीं त्यापैकीं प्रत्येकजण तळमळतो आहे. तें सुख--तो आनंद म्हणजे लोकप्रसिद्धी--कीर्ती, वर्तमानपत्रांत झळकणारीं नांवें, मासिकांत तळपणारे फोटो, जनतेच्या जिव्हेवर नाचणारे जयजयकार! आणि हें सर्व जवळचा पैसा खर्च केल्याशिवाय त्या चौघांनाही पाहिजे आहे!

डिसेंबरची २६ तारीख आहे. सायंकाळचे चार वाजले आहेत. बंगल्याच्या व्हरांड्यांत एका चौकोनी टेबलाभोंवतीं प्रत्येक टोंकाला एकाएका खुर्चीवर चौघे मित्र उपरोक्त सुखस्वप्नांच्या हवेल्या हवेंत रचीत स्वस्थ बसले आहेत. डाव्या हातावर डावा गाल टेंकून प्रत्येकजण विचारमग्न दृष्टीनें छपराच्या तक्तपोशीकडे

वर पहात आहे. चौघांच्या मध्यें टेबलाच्या मध्यभागीं एक सिगारेट केस पडली आहे. एक, दोन, तीन, चार मिनिटें सिगारेटच्या धुरानें भरलेल्या स्तब्धतेंत निघून जातात. चौघांच्याहि डोक्यांत कांहीं तरी विचार चमकतो. चौघेही एकदम खालीं माना करून टेबलावर उजव्या हातानें जोराची थाप मारतात व एकमेकां-कडे पहातात.]

**चौघेही** : (एकदम) आली कल्पना !

**चौघेही** : (एकमेकाकडे पहात) काय ?

**चौघेही** : (एकमेकांना) तुम्ही सांगा अगोदर ! (चौघेही सिगारेट-केसमधून एक एक नवी सिगारेट घेऊन शिलगावतात व एकएक झुरका घेऊन धूर सोडतात.)

**वकील** : (धूर सोडल्यावर) आधीं मी सांगतो. आपण एक चित्र-पट कंपनी काढूं या. 'Modern Industry' आहे ही. ती एक उगवती कला आहे. एकदा का एकादा सुंदर चित्रपट देशांत झळकला, कीं एका आधुनिक कलेचे रसिक आश्रयदाते म्हणून साऱ्या देशभर आबालवृद्धांच्या जिभेवर आपलीं नांवें नाचूं लागतील.

**डॉक्टर** : Exactly. माझी तीच कल्पना होती.

**जमीनदार** : मघांशीं माझ्या डोक्यांत तेंच आलं होतं.

**व्यापारी** : मला सुचलं तें, पण मी बोललों नाहीं, कारण हा धंदा तितका safe नाहीं. चार लोक नांव घेतील म्हणून आपण आपला पैसा घालायला तयार नाहीं या धंद्यांत !

**वकील** : अरे पण पैसे घालायला सांगतो कोण तुम्हांला ? आपण थोडेच पैसे घालतो आहोंत आपले ?

**जमीनदार** : म्हणजे पैशाशिवाय सिनेमाचा धंदा करतां येतो कीं काय ?

**वकील** : तसं नव्हे रे, पैसा हवा. पण आज आपल्या नांवाला कांहींतरी मान आहे जगांत. आपलं नांव असेल तर 'जनताजनार्दन' हवा तितका पैसा देईल.

**डॉक्टर** : Yes, yes. Public is bound to have faith in us.

**व्यापारी** : कबूल, पण आपल्यापैकीं या धंद्याची माहिती कुणाला आहे ?

**वकील** : माहीतगार 'technicians' आपणाला हवेत. पण बाजारांत आज आपल्या 'technicians' ना कांहीं वाण नाहीं.

**जमीनदार** : अच्छा, विचार करण्यासारखा मुद्दा आहे. विचार करूं या आपण. (चौघेही संपत आलेल्या सिगारेटचीं थोटकें बाहेर भिरकावून देतात व पुन्हां डाव्या हातावर डावा गाल टेंकून विचारमग्न नजरेनें वर तक्तपोशीकडे पहात रहातात. हळूहळू अंधार होतो, व वाढत्या अंधारांत दृश्य अदृश्य होतें.)

## दृश्य २ रें

(मुंबईतील गिरगांव भागांतला एक दोन खोल्यांचा ब्लॉक्. बाहेरच्या खोलींत एका जाजमावर चौघे तरुण मित्र सिगारेट ओढीत बसले आहेत. त्या चौघांपैकीं एक कलावंत आहे. दुसरा अकाउंटंटची परीक्षा नुकताच पास झाला आहे तिसरा कथालेखक आहे; आणि चौथा उपसंपादक आहे. ती खोली अकाउंटंटच्या मालकीची आहे.

चौघांनाही सिनेमा पाहण्याचा कमालीचा षोक आहे. चौघांनींही चित्रपटकले-वरील खूप पुस्तकें वाचलीं असून कुठल्याही देशी अगर परदेशी चित्रपटापेक्षां आपण शंभरपटींनें चांगला चित्रपट काढूं शकूं, असा प्रत्येकाला आत्मविश्वास आहे. चित्रपट काढण्याकरितां आपणांकडे पैसा नाहीं. त्यामुळें आपल्या असामान्य प्रति-भेचा जागतिक चित्रपटकलेला आपण फायदा देऊं शकत नाहीं, याची प्रत्येकाला

राहून राहून हळहळ वाटत आहे. विषयाचा खोल अभ्यास आहे. चित्रपट काढण्याची बलवत्तर इच्छा आहे. पण चित्रपट काढण्याकरितांच काय, पण आणखी कांहीं नेहमीच्या गरजा भागविण्याइतका सुद्धां जवळ पैसा नाहीं !

डिसेंबरची २६ च तारीख. सायंकाळचे चारच वाजले आहेत.

चौघेही मित्र जाजमाच्या मध्यभागीं असलेल्या ashpot मध्यें आळीपाळीनें सिगारेटची राख झाडीत आहेत. चौघेही पैसा उभा करण्याच्या विवंचनेंत आहेत. )

**कलावंत** : (राख झाडीत) आपल्या ओळखीचा एक आहे बुवा!

**कथालेखक** : (राख झाडीत) माझ्याही डोक्यांत एक नांव येतेंय !

**उपसंपादक** : (राख झाडीत) तसा माझ्या एक लक्षांत आला आहे.

**अकाउंटंट** : मीही एकीकडे खटपट करीन म्हणतों.

**कथालेखक** : अरे एक एक कां म्हणतां ? त्यांचीं नांवं बोला कीं ! करून टाकूं खटपट एकदां भेटून प्रत्येकाला.

**उपसंपादक** : मग महाराज, तुम्हीच सांगा कीं तुमचा कोण तो!

**कलावंत** : वाद कशाला ? मी सांगतों माझी Party. आपला तो जमीनदार आहेना ? रगड पैसा आहे त्याच्याजवळ. त्याचं नांव झळकवतों जिकडे तिकडे म्हणून सांगितलं, कीं घालील पैसा थोडासा. तसा षोकी आहे तो सिनेमाचा.

**कथालेखक** : मी घालणार आहें गळ आमच्या डॉक्टरला. पैसा मिळवला आहे खूप. आतां जरा लोकांपुढें यायला पाहतोय् ! काढूं दहापांच हजार त्याच्याकडून.

**उपसंपादक** : आपण आपल्या त्या वकीलाला पकडणार.

**अकाउंटंट** : आपलं व्यापारी कुळ घालील थोडे पैसे.

**कथालेखक** : नाहींतर काय ? अशीं प्रसिद्धीला हपापलेलीं

कुळंच पकडलीं पाहिजेत ! त्याशिवाय फिल्मकंपनी काढायला पैसा उभा व्हायचा नाहीं. आपल्याकडे ' स्टोरी ' तर आहेच.

**उपसंपादक** : ( कलावंताकडे पहात ) सीनसीनरी आणि डायरेक्शनच्या बाबतींत आपल्याला पाह्यलाच नको !

**कलावंत** : [ उपसंपादकाकडे पाहात ] आणि तुम्ही ह्या प्रसिद्धीचा धुमाकूळ उडवून !

**अकाउंटंट** : ऑफिसची जबाबदारी आपल्याकडे.

**उपसंपादक** : हें सर्व ठीक आहे. पण त्या चोरांनीं, अगोदर तुम्हीच कांहींतरी थोडीबहुत पैशाची व्यवस्था करा म्हणून सांगितलं तर ?

**कथालेखक** : अरे हवे तसे बनवूं त्यांना आपण. त्यांना सांगूं, पैशाचं काय मोठंसं ? Public Ltd. कंपनी काढूं. तुमच्या नांवाच्या जोरावर ' जनताजनार्दन ' हवा तितका पैसा देईल !

**अकाउंटंट** : म्हणजे खरोखरच ' जनताजनार्दन ' पैसे देईल की काय आपणांला ?

**कथालेखक** : अरे खुळ्या, जनताजनार्दन कसला देतो पैसे ! एकदां या बड्या धेंडांचीं नांवें बाहेर झळकवलीं, कीं लोकांनीं पैसे नाहीं दिले, तरी यांना आपले पैसे घालून कंपनी चालूच नाहीं का करावी लागणार ? आपल्या नांवाच्या पतीची त्यांना कांहीं तरी किंमत आहेच कीं नाही ?

**कलावंत** : अच्छा ! ठरलं तर मग. पहिल्यांदा आपण जमीनदारांना भेटायला जाऊं.

**कथालेखक** : कुठें ?

**कलावंत :** नाताळच्या सुट्टींत ते लोणावळ्याला गेले आहेत म्हणे.

**उपसंपादक :** अरे बापरे! लोणावळ्याला जाण्यायेण्याच्या तिकिटा-इतके पैसे नाहींत, बुवा, सध्यां आपल्याजवळ.

**अकाउंटंट :** माझ्याजवळ तर स्टेशनावर जायला ट्रामपुरतेसुद्धां पैसे नाहींत. विचार करूं या आपण त्या प्रश्नाचा !

( चौघेही सिगारेट्स पेटवून धुराचे लोट सोडीत त्या प्रश्नाचा विचार करीत बसतात. हळूहळू अंधार होतो, व वाढल्या अंधारांत दृश्य अदृश्य होतें. )

## दृश्य ३ रें

( लोणावळें येथील जमीनदारांचा बंगला. देखावा पहिल्या दृश्यासारखाच.

जानेवारीची १ ली तारीख. संध्याकाळीं चारचीच वेळ. व्हरांड्यामध्यें १ ल्या दृश्यांतल्याच चौकोनी टेबलाभोंवतीं जमीनदार, वकील, डॉक्टर व व्यापारी हे चौघे मित्र पहिल्या दृश्याप्रमाणेंच सिगारेटचा धूर सोडीत, वर तक्तपोशीकडे विचारमग्न नजरेनें पहात बसले आहेत; याचा अर्थ उघड उघड हाच, कीं पहिल्या दृश्यांत ते ज्या विचारांत गुंग झाले आहेत त्याच विचारांत ते आज संध्याकाळींही गुंग आहेत. )

**वकील :** ( भानावर येऊन ) काय मौज आहे ! आपल्या नांवाची बाजारांत पत आहे! 'जनताजनार्दन' हवा तितका पैसाही देईल! पण विश्वासू 'Technicians' कुणी ध्यानांत येत नाहींत!

**व्यापारी :** (भानावर येऊन) आणि तोच मुख्य मुद्दा आहे.

**डॉक्टर :** 'Technicians' शिवाय काय होणार आहे.

**जमीनदार :** बाबा, 'Technicians' कुठून आणा—

( 'आणायचें' या शब्दातलीं 'यचे' हीं अक्षरें जमीनदारसाहेबांनीं उच्चारा-वयाच्या आंतच बंगल्याच्या फाटकांतून कलावंत, उपसंपादक, कथालेखक व अकाउंटंट आंत शिरतांना दिसतात. जमीनदार कलावंतांना ओळखतात; व जमीन-दारासह ते चौघेही आंत शिरणाऱ्या त्या चौघांकडे पहात रहातात. कलावंताच्या

काखेंत Pudovkin, Paul, Rotha वगैरे लेखकांचीं चित्रपटकलेवरील तीन चार पुस्तकें आहेत. उपसंपादकांनीं दोन तीन वर्तमानपत्रें व तीनचार मासिकें बगलेंत मारलीं आहेत. कथालेखकांच्या हातांत कातड्याचें काळें कव्हर असलेली एक फाइल असून त्यांत निरनिराळ्या कथानकांचीं हस्तलिखितें आहेत. अकाउंटंटच्या हातांत कांहीं नाहीं; पण कोटाच्या वरच्या खिशाला प्रमुख जागीं त्यांनीं पार्करचें फाउंटनपेन अडकविलें आहे. जमीनदारसाहेब कलावन्ताकडे पाहून 'या' 'या' म्हणत त्या चौघांचेंही स्वागत करतात. व्हरांड्यात आल्याबरोबर उपसंपादकांची दृष्टि वकिलावर, कथालेखकांची डॉक्टरवर व अकाउंटंटची व्यापाऱ्यावर पडते. आपापलीं कुळें एकदम एके ठिकाणीं मिळाल्यामुळें चौघेही आश्चर्यानंदानें स्तिमित होतात, व आपापल्या कुळांची एकमेकांना ओळख करून देऊन एकमेकांकडे अशा दृष्टीनें पहातात कीं, त्याचा अर्थ "आपणाला शकुनच लागलेला दिसतो! परमेश्वर आपल्या बाजूचा आहे!" असा होतो! त्या चौकोनी टेबलाभोंवतीं आणखी चार खुर्च्या ओढल्या जातात; आणि पूर्वी जिथें चौघेजण बसले होते तिथें आतां आठ माणसें बसतात. आठही जण सिगारेट्स ओढूं लागतात.)

**जमीनदार** : ( कलावंताकडे पहात ) काय इकडे कुठें ?

**कलावंत** : ( मुख्य विषयावर बोलावयाचें टाळून ) सहज पुण्याकडे चाललों होतों आम्ही चौघेही कांहीं कामाला; मी म्हटलं तुम्ही इथं आलां आहांत. आपलं सहज भेटून जावं !

**जमीनदार** : हीं पुस्तकं कसलीं आहेत बुवा ?

**कलावंत** : अशीच आपलीं चित्रपटकलेसंबंधीं आहेत.

**व्यापारी** : काय चित्रपटकलेसंबंधीं ?

**कलावंत** : हूं !

( व्यापारी वकिलाकडे पहातात. वकील डॉक्टरकडे व डॉक्टर जमीनदाराकडे पहातात. पण मुख्य विषयाची गोष्ट चौघांपैकीं कुणीच काढीत नाहीं. तशी गोष्ट काढल्यास आपण पैसा घालावयाला तयार आहोंत, अशी त्या नवागत चौघांची समजूत होऊन आपणाला पैसा घालावा लागेल अशी त्या चौघांना भीति वाटते. तेव्हां ते आडून आडून खडे टाकूं लागतात. )

**व्यापारी** : म्हणजे कांहीं चित्रपट कंपनीची खटपट करायला पुण्याला चाललां आहां वाटतं तुम्ही चौघेही ?

**कथालेखक** : ( मुख्य विषयावर बोलावयाचें टाळून ) छे छे ! ( आपली कातडी फाइल दाखवून ) पुण्याच्या एका कंपनीनें माझ्या-कडे कथानकाची मागणी केली आहे. तेव्हां दाखवायला चाललों होतों आपला सहज. ( कलावंताकडे पहात ) यांना डायरेक्शनची वगैरे चांगली माहिती आहे; तेव्हां म्हटलं 'चला.' कथानकांत फेरफार वगैरे करावयाला यांची चांगली मदत होईल.

**कलावंत** : छे बुवा, आपणाला तितकं कांहीं समजत नाहीं. या बाबतींत final opinon ( उपसंपादकाकडे पहात ) यांचंच !

**डॉक्टर** : म्हणजे पुण्याला एकादी नवीन कंपनी निघाली आहे, अन् तुमचा त्यांत भागबीग आहे कीं काय कांहीं ?

**कलावंतादि चौघेही** : ( एकदम ) छे, छे, छे, छे ! तसं कांहीं नाहीं. ( आपण कंपनी काढावयाच्या खटपटींत आहोंत अशी या चौघांची समजूत झाल्यास हे चोर कांहींही पैसे न देतां 'तुम्हींच थोडे पैसे घाला, व आपल्या नांवाचा फक्त उपयोग करा' म्हणून सांगतील, या भीतीनें हे चौघेही मनांतली मुख्य गोष्ट न बोलतां त्या गोष्टीला 'त्या' चौघांनीं सुरवात करावी या अपेक्षेनें संभाषण चालवीत आहेत. )

**जमीनदार** : म्हणजे तुम्ही चौघेही या लाइनमधले चांगलेच 'technicians' आहांत असं दिसतं !

**कलावंत** : (विनयानें) चांगलेच नाहीं, पण 'technicians' आहोंत !

**वकील** : (संभाषणांतली ही उडवाउडवी सहन न होऊन एकदम) अहो मग तुम्ही स्वतःच एकादी कंपनी कां काढीत नाहीं ?

**अकाउंटंट** : ( धूर्तपणें ) तुमच्यासारख्यांचीं नांवं आमच्या पाठीशीं असलीं तर कंपनी काढायला काय हरकत आहे म्हणा !

**व्यापारी** : ( धूर्तपणें ) आमच्या नांवांचं काय म्हणा. नांवं मिळतील.

**उपसंपादक** : झालं तर मग. पैशांची काय मोठीशी चिंता नाहीं.

**जमीनदार** : वः ! पैशांची चिंता नाहीं कशी ? ( आपल्या इतर तीन सहकाऱ्यांकडे धूर्तपणें पहात ) तशी कांहीं काळजी नव्हती, पण आमचे बहुतेकांचे पैसे कुठेंना कुठें तरी सध्यां अडकून पडले आहेत !

**कथालेखक** : त्याचं कांहीं नाहीं मोठंसं हो. तुमचीं नांवें असल्या-वर, ' जनताजनार्दन ' हवे तितके पैसे देईल !

**डॉक्टर** : Public is bound to support such a cause as this

**वकील** : आपणांला बुवा या धंद्यांतलीं कांहीं माहिती नाहीं. आपण आपलं नांव देणार, ( त्या चौघांना ) ते तुमच्या विश्वासावर. सर्व organise तुम्हीं केलं पाहिजे.

**उपसंपादक** : तें सहज होईल हो, एकदां तुमचीं नांवें असलीं कीं.

**जमीनदार** : बरं तर मग. याच बैठकीला या scheme चा विचार करा.

**अकाउंटंट** : Yes, yes. इथल्या इथंच आपण विचार करून काय तें ठरवूं.

( आठहीजण सिगारेट पेटवून धूर सोडीत तक्तपोशीकडे पहात विचार करूं लागतात.

हळू हळू अंधार होतो व वाढत्या अंधारांत दृश्य अदृश्य होतें. )

## दृश्य ४ थें

( मागच्या प्रवेशानंतर चार महिने उलटून गेले आहेत. आतां मे महिना चालू आहे. उन्हाळा घालविण्याकरितां जमीनदारसाहेब आपल्या लोणावळ्याच्या बंगल्यांत रहावयास आले आहेत. वकील, डॉक्टर व व्यापारी हे तिघे मित्रही चार दिवसांकरितां मागील नाताळच्या सुट्टीप्रमाणेंच जमीनदारांकडे आले आहेत.

आतां परिस्थिति फार आणीबाणीची झाली आहे. तिसऱ्या दृश्याच्या शेवटी Public Ltd., Co. च्या scheme चा विचार होऊन पैसे जमविण्याकरितां ' technicians ' मुंबईला गेले आहेत. पण या बाजूला कफल्लक ' technicians ', आणि त्या बाजूला गब्रू ' नांववाले ' उभे असूनही अनादिकालःपासून व्यावहारिक शहाणपणा अंगांत मुरलेला ' जनताजनार्दन ' या योजनेला अमूर्त पसंती दाखवूनही मूर्त पैसा देण्याचीं चिन्हें दाखवीत नाही. एक महिना, दोन, तीन, चार महिने लोटले तरी पैसा कांहींच कसा उभा होत नाहीं, म्हणून ' नांववाले ' संतापून गेले आहेत. सर्व संताप त्यांनीं ' जनताजनार्दना ' वर काढला असता पण ' जनताजनार्दन ' पडला अशरीरी ! तेव्हां चार महिने झाले तरी कुठून ना कुठून तरी पैसा उभा करावयाला या कलावंतांना काय झालें, म्हणून चौघेही ' नांववाले ' खदिरांगारासारखे लाल होऊन धुमसून राहिले आहेत. ' Technicians ' याहूनही भयदायी मनःस्थितींत आहेत. एक महिना, दोन, तीन, चार महिने होत आले; विनंत्याविनवण्यांना न जुमानतां ' जनताजनार्दन ' अचल राहिला ही गोष्ट सोडून दिली तरी साऱ्या गांवभर स्वतःच्या बड्या नांवाचा बभ्रा झाला तरी, जनाची नसली तरी मनाची लाज बाळगून अजूनही हे ' नांववाले ' स्वतःच्या ठेवींतला पैसा कसा काढीत नाहींत, म्हणून चारही ' technicians ' चौघा ' नांवकऱ्यां ' वर अधीर संतापानें थरथरत आहेत.

मे महिन्यांतला तो घोर भयानक दिवस उजाडला आहे. मनांतल्या गोष्टी बेफामपणानें बोलून टाकून, या प्रकरणाचा आज सोक्षमोक्ष लावून टाकावयाचा

या निष्ठूर निश्चयानें कटिबद्ध होऊन चौघेही' technicins,' week-end रिटर्न तिकिटें घेऊन लोणावळ्याच्या प्लॅटफॉर्मवर उतरले आहेत.

इकडे आजच्या आज ' बाप दाखव नाहींतर श्राद्ध कर ' म्हणून चारही ' technicians ' चे निर्दयपणें कान उपटून त्यांच्या हातावर ठेवावयाचे, असा अघोर बेत करून चारही ' नांववाले ' मुंबईला जाणारी गाडी पकडण्या-करितां लोणावळयाच्या प्लॅटफॉर्मवर पातले आहेत.

समोरच्या प्लॅटफॉर्मवरून चारही 'technicians' च्या दृष्टीला, विरुद्ध बाजूच्या प्लॅटफॉर्मवर उभे असलेले चारही 'नांववाले' पडतात. मुंबईची गाडी यावयाला अजून पंधरा मिनिटें अवकाश आहे. चौघेही 'technicians' श्वास कोंडून धरून छात्या घट्ट फुगवून धरतात, व मधला पूल ओलांडून पली-कडच्या प्लॅटफॉर्मवर चाल करून जातात. ते येत असलेले चौघाही 'नांववाल्यां'च्या दृष्टीला पडतात. तेही श्वास कोंडून छात्या घट्ट करतात. ते चौघे या चौघांच्या समोर येऊन उभे रहातात. घण आणि ऐरणीची नजरेला नजर भिडून ठिणग्या उडण्याच्या वातावरणानें स्टेशन भरून जातें.)

**वकील** : (शांततेचा भंग करून) काय, पैशांची काय व्यवस्था ?

**कथालेखक** : पैशांची व्यवस्था कसली ? पैशांची व्यवस्था, आणि ती तुम्हीं करायची !

**व्यापारी** : अस्सं काय ?

**उपसंपादक** : हो अगदीं अस्संच !

**कलावंत** : चार महिने ढोरासारखं खपायचं आम्ही आणि पैसे घातल्याशिवाय नांवाच्या जोरावर फायद्याचं लोणी तुम्ही खाणार होय ?

**डॉक्टर** : आणि 'जनताजनार्दन' ?

**अकाउंटंट** : त्याच्या नांवाचं कीर्तन आम्हाला फसवायला तुम्हीं करायचं आणि तुम्हाला फसवावयाला आम्हीं करायचं ! 'जनताजनार्दना'-ला आतां बाजूला ठेवा आणि सरळ सरळ तुम्ही पैसे किती घालणार तें सांगा ?

**जमीनदार :** आमच्या पैशांवर तुमची नजर आहे.

**कथालेखक :** आणि आमचं technical knowledge फुकटांत लाटायला तुम्ही पहातां आहांत होय ?

**वकील :** तुम्ही एवढे अमूल्य 'technicians' आहांत, तर मोठ्या पगाराची कुठें तरी जागा न मिळवितां कंपनी काढण्याच्या भानगडींत कां हो पडतां ?

**उपसंपादक :** आम्हाला परक्याची गुलामगिरी नको आहे ! आम्ही आमच्या स्वतंत्र बुद्धीच्या जोरावर स्वतंत्र धंदा करूं इच्छितों.

**व्यापारी :** म्हणजे आमच्यासारख्या हलवायांच्या घरावर तुळशी-पत्र ठेवून स्वतंत्र धंदा करू इच्छितां वाटतं ?

**वकील :** (विरुद्ध बाजू बोलावयाच्या आंत) तुम्ही चौघे चोर आहांत !

**जमीनदार :** (दुसऱ्या बाजूला बोलूं न देतां) आमच्या नांवाचा बभ्रा करून आमची बदनामी केली आहे तुम्हीं.

**कलावंत :** (त्या सर्वांच्या वर आवाज चढवून) चोर तुम्ही चौघे-जण आहात ! तुमची बदनामी व्हायला तुमच्या नावाला कवडीइतकीही किंमत नाहीं बाजारांत ! ( गाडी स्टेशनांत शिरल्याचा आवाज येतो. )

**जमीनदारादि चौघे :** पाहून घेऊं.

**कलावंतादि चौघे :** आम्हीही पाहून घेऊं !

**( गाडी घस् घस् घस् घस् करीत स्टेशनांत येते. त्या प्रचंड आवाजांत भात्या-सारख्या खालीं वर होणाऱ्या त्या आठ वक्षःस्थलांमधून निघणारे उष्ण श्वास ऐकूं येत नाहींत. गाडी उभी रहाते. जमीनदारादि चौघे अदम्य रागाच्या भरांत**

खिशांतून एक एक सिगारेट काढून शिलगावतात व कलावंतादि चौघांकडे उच्चभ्रू तिरस्कारानें पाहून धूराचे भपकारे सोडीत फर्स्टक्लासच्या बाजूला छाती व डोकें वर काढून निघून जातात. त्याचवेळीं त्यांच्या नाकावर टिचण्याकरितांच कीं काय, तितक्याच आवेशानें आणि तितक्याच उच्चभ्रू तिरस्कारानें त्यांच्याकडे पहात कलावंतादि चौघे आपल्या खिशांतून एकदम खाकी विड्या काढतात, आणि झोकांत शिलगावून भस् भस् धुराचे ढग सोडीत थर्डक्लासकडे मिजाशींत पावलें टाकीत जातात. गाडी निघून जाते; आणि निर्जन, एकाकी असा प्लॅटफार्म तिथें रहातो. हळू हळू अंधार होतो, व वाढत्या अंधारांत दृश्य अदृश्य होतें. )

# ५

## श्री. शिवाजी शहाजी भोंसले—

[गिरगांवांतल्या एका घराचा वरच्या मजल्यावरचा ब्लॉक. रात्रीं दहाचा सुमार झाला आहे. श्रीधर आणि त्याचा मित्र कवि 'शिवर्किकर' उर्फ बाळू एका तिपाई टेबलापाशीं प्लँचेट घेऊन बसले आहेत. घड्याळाची कट् कट् कट् चालू आहे. ठण् ठण् ठण् दहाचे टोले पडतात.]

**कवि** : बाप रे, दहा वाजले. पुरे झालं बुवा, तुझं हें प्लँचेट !

**श्रीधर** : बस रे, काय घाई आहे; आणखी बोलावूं कुणाला तरी प्लँचेटवर. आपला विश्वास बसतो याच्यावर बाळू,—कांहीं म्हण तूं.

**कवि** : बस झालं. आतां पाऊस थांबलाय. जाऊं दे मला. बायको बसली असेल घरीं शिव्या मोजीत !

**श्रीधर** : काका यायचे आहेत साडेनऊच्या गाडीनें. मला जाग राह्यलंच पाहिजे ते येईपर्यंत. त्यांना नीट पत्ताही माहीत नाहीं. तूं

महाराष्ट्राचा शाहीर म्हणवितोस ना स्वतःला ? मग शिवाजीलाच बोलावूं या प्लँचेटवर. पाहूं या तर खरं काय म्हणतात शिवाजी महाराज तें !

**कवि** : पुनः माझी थट्टा करायला लागलास वाटतं ? होय, ठांसून सांगतों. मला तुमच्या हिंदुस्थानची मुळींच किंमत नाहीं. झक् मारत गेले तुमचे बंगाल आणि बिहार ! आपल्या राष्ट्राचं गतस्वातंत्र्य पुन्हां मिळवलं पाहिजे. भगवा झेंडा शनवारवाड्यावर फडफडला पाहिजे. आम्हां महाराष्ट्रसंस्कृतीच्या अभिमान्यांची तुला थट्टा वाटते होय ?

**श्रीधर** : नाहीं रे बुवा, तुमची थट्टा कोण करील ! गोफणगोट्यांनीं ठार कराल तुम्ही आम्हाला ! बरं तें जाऊं द्या. खरंच बोलावूं या प्लँचेटवर शिवाजी महाराजांना ?

**कवि** : होऊन जाऊं द्या. चला, बोंबलूं द्या बायको घरीं. मी वाटेल तितका वेळ बसायला तयार आहे.

**श्रीधर** : अच्छा, ठेव हात.

( दोन तीन क्षण स्तब्धतेंत जातात. बाहेर जोराचा पाऊस सुरू होतो. ढगांचा गडगडाट होतो. विजा चमकतात आणि कडाडतात. )

**कवि** : काय वादळ होतंय् कीं काय बाहेर.

( पावसाचा आवाज चालूच आहे. जोरानें विजा कडाडल्याचा आवाज ऐकूं येतो. 'फट्—फस्' असा 'फ्यूज' गेल्याचा आवाज होतो, आणि खोलींत काळोख होतो. )

**श्रीधर** : आतां काय करायचं काळोखांत ? अरे, फ्यूज गेलेली दिसते. काड्याची पेटी तरी आहे का तुझ्या खिशांत, बाळू ? या मिट्ट काळोखांत आतां शोधून कांहीं मिळणार नाहीं मला खोलींत.

**कवि** : आहे ना पेटी. घे की ही.

( पेटी दिल्याचा आणि श्रीधर उठल्याचा खुर्चीचा आवाज होतो. काडी ओढल्याचा आवाज. )

**श्रीधर** : आतां हा कंदील कुठं पडलाय आणखी !—आहे बुवा, मिळाला एकदांचा !

( कंदील घेऊन श्रीधर टेबलाकडे येतो तों कंदीलाच्या उजेडांत दोघांनाहि टेबलाजवळ एक आकृती उभी असलेली दिसते. तिचा दाढी-दार चेहरा हुबेहुब शिवाजीसारखा आहे. त्या व्यक्तीच्या अंगांत मात्र एक कुडतें असून कमरेला पंचा गुंडाळलेला आहे. )

**कवि** : जरा मोठा कर रे कंदील !

**दोघेही** : ( दचकून उभे राहातात. घाबरलेल्या आवाजांत ) कोण रे तूं, नी आलास कुठून ?

**शिवाजी** : मी शिवाजी. तुम्ही मला बोलावलंत ना ? म्हटलं प्लँचेटवर बोलण्यापेक्षां प्रत्यक्षच दर्शन द्यावं तुम्हांला. आमच्या पूर्व पुण्याईमुळें वाटेल तेव्हां देह धारण करून वाटेल तिथं आम्हांला जाता येतं. पहा पाहिजे तर. तुमचं दार बंद आहे तरी पण मघाशीं वीज कडाडली तेव्हां तिच्या प्रकाशांबरोबर खिडकींतून मी तुमच्या-समोर आलों.

**श्रीधर** : काय तुम्ही शिवाजी महाराज ?

**कवि** : तुम्ही शिवाजी महाराज ! मग तुमचा जिरेटोप आणि आंगरखा कुठें आहे ? भवानी तलवार कुठें आहे ? चेहरा बरीक पटतो आपणाला !

**शिवाजी** : शिवाजी झालों म्हणून मी काय झोंपतांना सुद्धां जिरेटोप, आंगरखा नी भवानी तलवारीचं खोगीर आंगावर घालून झोपूं कीं काय ? रात्रीं झोंपतांनासुद्धां मीं पंचा लावून झोपूं नये ? तुम्ही मला काय समजता रे ? आतां दहाची वेळ झाली आहे. वरती स्वर्गांत तानाजीबरोबर गप्पा करून नुक्ता कुठें मी लवंडत होतो. इतक्यांत तुमच्या प्लँचेटवरून आग्रहाचा संदेश आला. म्हटलं यावं एक चक्कर मारून पृथ्वीवर. तसाच्या तसा उठलों नी हा इथें आलों—अरे, असें वेड्यासारखे बघतां काय ? मी पंचा नेसलों त्यांत आश्चर्य काय ? बखरींत नी चित्रांत माझ्या जिरेटोपाची नीं आंगरख्याचीं वर्णनें तुम्ही वाचतां म्हणून खातापितांना, आंघोळ करतांना, रात्रीं अपरात्रीं तुमच्या चित्रांतल्या शिवाजीसारखा मी नटून थटून मिरवत होतों अशी तुमची कल्पना आहे काय ? मला काय नाटकांतला कीं सिनेमांतला शिवाजी समजलांत ? काय गाढव आहात रे. बसा खालीं !

**कवि** : बालकांना क्षमा असावी, आबासाहेब. आपण स्वराज्य-संस्थापक शिवराय आहा ? धन्य झालों आम्हीं ! रायगडच्या राण्या ! देशाच्या दैन्याचे लोखंडी लंगर ताडताड तोडून आपणच——

**शिवाजी** : अरे अरे हो हो ! याला काय वायु झाला कीं काय—

**श्रीधर** : नाहीं महाराज. हा तुमचा अनन्यभक्त आहे. हा आमच्या महाराष्ट्राचा शाहीर आहे. 'शिवकिंकर' या नांवानें तुमच्यावर यानें आतांपर्यंत शेंकडो कविता लिहिल्या आहेत !

**शिवाजी** : अस्सं ! मग हा माणसासारखा कां बोलत नाहीं ? सगळ्या कविता यानें अशाच भाषेंत लिहून माझी बदनामी केली आहे काय ?

**कवि** : महाराज, भलतीच भाषा दख्खनच्या दैदिप्यमान दिव्या-संबंधीं--

**शिवाजी** : खामोष ! थोबाड फोडून टाकीन जास्त बोललास तर. मला साधेपणाची अतिशय आवड आहे. याद राखून ठेव पुन्हां माझ्यासंबंधीं अशी भाषा वापरलीस तर. आज आलों तसाच पुन्हां येईन आणि--

**कवि** : भवानी तलवार घेऊन याल ना ?

**शिवाजी** : नाहीं. झाडाचा एक फोक तोडून आणीन, नी हिरवी काळी होईपर्यंत तुझी पाठ फोडून काढीन !

**कवि** : नाहीं बोलणार अशी भाषा, महाराज, पुन्हां.

**शिवाजी** : ठीक आहे. सहज फिरायला म्हणून आलों तो ही रे काय तुमची कटकट ?

**कवि** : आपणाला कांहीं कांहीं गोष्टी फार फार विचाराव्याशा वाटतात.

**शिवाजी** : बोल ना बेटा, तसा कांहीं मी रागीट नाहीं. माझा मोठेपणा विसरून मनमोकळेपणाने बोलण्याकरतांच आज मी इथें आलों आहे.

**श्रीधर** : महाराज त्या अफजुलखानाच्या वधासंबंधीं तुमच्यावर फार घाणेरडे आरोप करतात--कांहीं म्हणतात त्यानेंच अगोदर विश्वास-घात केला, बाकीचे म्हणतात तुम्ही--खरं काय तें तुम्हीच सांगा.

**शिवाजी** : वाहवा छान ! मी आणि अफजुलखान आतां वरती झालों आहोत जानी दोस्त, आणि दोनशें वर्षे झालीं तरी तुम्हीं अजून

एकमेकांचीं डोकीं फोडतां आहां, आमच्यापैकीं विश्वासघातकी कोण म्हणून ! स्वतः अफजुलखान खूष आहे माझ्यावर. मोठा शेर आहे बेटा. शत्रू असावा तर असा असावा. तो म्हणतो तूं मारलं नसतस मला, तर मी तुला मारलं असतं. शत्रूशीं व्यवहार करतांना कसला विश्वासघात, नी कसलं काय ? लक्ष पुढल्या कार्यावर पाहिजे. अफजुलखान मोठा उमदा, दिलदार गडी आहे. त्याची कांहींच तक्रार नाहीं माझ्याविरुद्ध ! कालच तर त्यानें मला बिरयानी खिलवली !

**कवि** : शिव शिव, महाराज. आपल्या तोंडीं ही भाषा शोभत नाहीं. आपल्या तोंडून सदासर्वकाळ गोब्राह्मणप्रतिपालनाची नी भगव्या झेंड्याचीच भाषा बाहेर पडली पाहिजे. बिरयानी नी बकऱ्यांच्या गोष्टी श्रीशिवरायानीं बोलाव्या ! हर हर !

**शिवाजी** : बोलणार, जरूर बोलणार ! करायचं तेव्हां गोब्राह्मणप्रतिपालन केलं नी भगवा झेंडाही फडकावला. पण म्हणून सामान्य माणसासारखं बोलावं चालावसं मला कधीं वाटूंच नये कीं काय ?— खरंच मोठ्या माणसांच्या दुःखाची तुम्हांला कल्पना नाहीं. केव्हां केव्हां असा वीट येई मला या मोठेपणाचा !—

**श्रीधर** : मोठेपणाचा वीट !

**शिवाजी** : वीट नाहीं तर काय ? हजारों लोक आपल्यावर भक्ती करतात आणि आपणाला मोठेपणा देतात. आपणालाहि त्यांच्या भक्तीचा नी श्रद्धेचा फायदा घेऊन आपलं कार्य करायचं असतं. तेव्हां स्वतःच्या इच्छा, आकांक्षा भावना मारून लोकांना आपण जसं वागावसं वाटतं तसं वागावं लागतं. पण केव्हां केव्हां हा कोंडमारा अगदीं

असह्य होतो. तुमच्या हिंदुस्थानांतला एक महाराजा नुकताच वर आला तोही हीच तक्रार परवां माझ्याकडे करीत होता.

**श्रीधर** : कोण हा महाराज ?

**शिवाजी** : नांवं कशाला पाहिजेत ? पण त्याची तक्रार मात्र रास्त होती. अमूप पैसा होता त्याच्याकडे. बायका, मुलं, ऐश्वर्य, सर्व कांहीं होतं. प्रजेचंही त्याच्यावर अपरिमित प्रेम होतं. पण स्वतःची एक लहानशी इच्छा त्याला पुरी करतां येईना.

**कवि** : पैसा असल्यावर काय अशक्य आहे, महाराज ?

**शिवाजी** : पुष्कळच अशक्य आहे. देवडीवर बसून हुजऱ्या-बरोबर विडी ओढावी, असं त्या महाराजाला कित्येक वेळां वाटे. पण तें जमायचं कसं ? तो पडला राजाधिराज ! शेवटपर्यंत त्याची ही इच्छा कांहीं पुरी झाली नाहीं. अजून कुरकुरतो बिचारा ! मला त्याच्या स्थितीची चांगली कल्पना येते. माझ्या अशा कित्येक इच्छा मला दाबून टाकाव्या लागल्या आहेत. ( निःश्वास टाकून ) त्या झेबुन्नि-साच्या प्रेमाची आठवण झाली कीं अजूनहि—

**दोघेही** : काय महाराज ?

**शिवाजी** : जाऊं द्यात. हव्यात कशाला त्या गोष्टी !

**कवि** : नाहीं महाराज. मला तरी त्या हव्यात. तुमच्या त्या प्रेमकथेवर सध्यां मी एक हृदयंगम कादंबरी लिहितो आहे.

**शिवाजी** : झेबुन्निसावर नी माझ्यावर कादंबरी ! काय लिहितोयूस ?

**कवि** : तिची तुमच्यावर पहिल्यांदा नजर गेली, आणि प्रेम जडलं त्या रोमांचकारी प्रसंगावर मी माझ्या कादंबरीची उभारणी केली आहे.

**शिवाजी** : कसला रोमांचकारी प्रसंग? काय, बहकतोस काय तूं

**कवि** : म्हणजे तुम्ही औरंगजेबाच्या दरबारांत तें वीरश्रीयुक्त दणदणीत भाषण केलंत. तेव्हां वरच्या सज्जांत बसलेल्या झेबुन्निसानें चिकाच्या पडद्यांतून पहिल्यांदा तुम्हांला पाह्यलं तेव्हां—

**शिवाजी** : ही काय भानगड बुवा? मी ते भाषण केलं तेव्हां झेबुन्निसाच काय पण कुणीही स्त्री दरबारांत हजर नव्हती. तुम्ही इतिहासकार नी कादंबऱ्या लिहिणारे थापा मारता तरी काय काय?

**कवि** : म्हणजे तुमची नी तिची भेट कधीं झालीच नाहीं?

**शिवाजी** : झाली ना भेट. पण ती अगदीं साध्या प्रसंगीं. त्यांत रोमांचकारी कांहींच नव्हतं.

**श्रीधर** : कुठं भेटली तुम्हाला ती?

**शिवाजी** : मला ज्या राजवाड्यांत नजरकैदेंत ठेवलं होतं त्याच्या समोरच झेबुन्निसाचा महाल होता. ती रोज मला खिडकींत दिसायची, पण माझं असल्या गोष्टीकडे विशेष लक्ष कधींच नव्हतं. एकदां सकाळीं खिडकींत ती केंस विंचरीत उभी होती. मीही दाढीवरून हात फिरवीत माझ्या खिडकींत उभा होतो. किती दिवसांत दाढीवरून फणी फिरवली नव्हती मी. त्यामुळें दाढींत विलक्षण गुंतागुंत झाली होती. औरंग-जेबानें बाकी सर्व व्यवस्था माझी घरच्यापेक्षां चोख ठेवली होती. पण सबंध राजवाड्यांत कंगवा एकही नव्हता. मीही मागेन मागेन म्हणून आळस केला होता. तिला केंस विंचरतांना पाहून मला एकदम आठवण झाली, नी काय झालं कोणाला ठाऊक मागचा पुढचा विचार न करतां मी एकदम माझ्या दाढीकडे बोट दाखवून खुणेनें तिच्याकडे फणी

मागितली. ती मोठ्यांदा हंसली. आणि ताबडतोब तिनें फणी पाठवून दिली. माझ्या मनमोकळेपणावर ती भलतीस खूष झाली! अशी तिची नी माझी ओळख झाली.

**श्रीधर** : काय जुलूम आहे! इतिहासांत हें कांहींच दिलेलें नाहीं हो!

**शिवाजी** : कसं देणार ? त्यांना तरी बिचाऱ्यांना काय माहित ? ही गोष्ट मी आतांपर्यंत कुणाकडेच बोललो नव्हतों.

( दारावर टक् टक् आवाज होतो. ' अरे श्रीधर ' म्हणून काकांचा आवाज बाहेरून येतो. )

**श्रीधर** : काका आले वाटतं.

**शिवाजी** : जातो तर मीं.

**श्रीधर** : महाराज, एकच विनंती आहे. आमच्या काकांना आपलं पुण्यदर्शन होऊं द्या. मग आपण जावं. ( दारावर आवाज ) आलोच, काका. (दार उघडल्याचा आवाज. ट्रंक् ठेवल्याचा आवाज.)

**काका** : ( हमालाला ) किती पैसे द्यायचे रे तुला ?

**हमाल** : दोन आणे.

**काका** : ठेवलेत तुझ्या काकानें, लेका. एक ट्रंक् खालून वर आणायला दोन आणे तुझ्या बापानें घेतले होते का कधीं ? दोन पैसे घे पाहिजे तर. नाहींतर चालता हो.

**हमाल** : शेट, गरीबाच्या पोटावर कां मारतां ? पांच मजले चढायची केवढी मेहनत—

**काका** : हे दोन पैसे घे नी चालता हो. रात्रीच्या वेळीं हुजत घालूं नकोस.

**श्रीधर** : काका, एक आणा द्या त्याला, जाऊं द्या.

**काका** : एक आण्याचा प्रश्न नाहीं; पण हे हमाल सोकावतात. तुमच्यासारख्या मूर्ख लोकांनींच यांना चढवून ठेवलेत. चल, जारे, हा घे आणा !

**हमाल** : पण शेट—

**काका** : आतां जा नाहीं तर धक्का मारून घालवीन. हुश्श ! हुश्श ! ( शिवाजीकडे पाहून ) हे कोण ?

**श्रीधर** : हे शिवाजीमहाराज.

**काका** : त्या उपासनी महाराजांचा नाद सोडल्यावर आतां हे नवीन महाराज आणलेस वाटतं कुणी ?

**कवि** : काका, हे बुवा नव्हत. हे स्वराज्यसंस्थापक शिवाजीमहाराज !

**काका** : बेट्यांनों, मला बनवतां होय ? कुठल्या नाटक कंपनींत काम करतात हे ? खेळ संपल्यावर इथें आले कीं काय ? टोप नी अंगरखा उतरून पंचा नेसले तसंच, दाढीमिशांचं जंगल कां नाहीं यांनीं उतरलं ? कुठं याच चाळींत रहातात कीं काय ?

**श्रीधर** : काका, काय बोलतां तुम्ही हें ? प्रत्यक्ष शिवाजीमहाराजांचा तुम्हीं अपमान करतां आहां. महाराजांच्या पायावर डोकं ठेवा !

**काका** : माहीत आहे रे. अरे, शिवाजी, जा आतां. कुठें खालच्या मजल्यावर रहातोस काय ? फार रात्र झाली आतां. झोप जा. उद्यांच्या खेळांत काम असेलच तुला !

**श्रीधर + कवि** : काका तुम्ही—

**शिवाजी** : ( मोठ्यांदा हंसून ) अरे काकावर काय रागावतां ? त्या बिचाऱ्यांना काय माहीत. जातों मी.

( एकदम वर जातात. )

**काका :** अरे खरंच हे चार फूट अधांतरी गेले कीं ! महाराज, महाराज, क्षमा करा या पाप्याला. ( थोबाडींत मारून घेतो ) क्षमा करा. एक वेळ आपल्या पायावर डोकं ठेवूं द्या.

**कवि :** महाराज, आम्हाला शेवटचा संदेश द्या.

**शिवाजी :** ( हंसून ) संदेश हाच, कीं आम्हीही माणसं आहोंत हें विसरूं नका ! ( ढगांचा गडगडाट नी विजांचा कडकडाट होतो. )

**श्रीधर + कवि :** पहा, पहा, काका विजेच्या प्रकाशाबरोबर महाराज खिडकींतून एकदम अदृश्य झाले !

( पुन्हां एकदां विजेचा कडकडाट. )

# ६

## आत्महत्त्या—

[ खार येथील एका टुमदार बंगलीचा दिवाणखाना. दिवाणखान्यांतलें फर्निचर साधेंच पण सुंदर आहे. मधल्या टेबलावरल्या फुलदाणींतलीं फुलें सुकून आंतल्या-आंत गळालीं आहेत. दिवाणखान्याच्या एका कोपऱ्यांत टेलिफोन आहे. खिडकी-जवळच असलेल्या पलंगावरली चादर, उशा आणि पांघरुणें अस्ताव्यस्त पडलेलीं दिसतात. पलंगावर झोंपलेला माणूस नुकताच उठला आहे हें उघड आहे. सकाळचे सात-सव्वा-सात वाजले आहेत.

मोहन, वय वर्षे तेवीस, दिवाणखान्यांत अस्वस्थपणें येरझाऱ्या घालतो आहे. रात्रभर झोंप न आल्यामुळें त्याचे डोळे तारवटल्यासारखे झाले आहेत. आणि झोंपेने विस्कटलेले केस तसेंच आहेत.

तो टेलिफोनकडे जातो. डायल फिरवून टेलिफोन करतो— ]

**मोहन** : (टेलिफोनमध्यें) हॅलो-हो, मी मोहन—माफ करा हं—मघांशीं तुमच्या शेजारचे ते जगन्नाथराव त्यांना मी निरोप सांगितला

होता—ते निघाले कां?—काय? पंधरा मिनिटं झालीं ते निघाल्याला?—अरेच्या! बरं, बरं. एक्स्क्यूज हं! (रिसीव्हर खालीं ठेवून स्वतःशींच चिडक्या स्वरांत) इथल्या इथं गांवांत यायला पंधरा मिनिटं पुरत नाहींत वाटतं! हा गाडीखालीं सांपडला कीं काय!

[इतक्यांत दरवाजा धाडकन् उघडून जगू, वय वर्षे चोवीस, प्रवेश करतो.]

**मोहन** : मध्येंच वाटेंत आणखी कुठं राह्यलास? आत्तां पुन्हां टेलिफोन केला.

**जगू** : वाटेंत फक्त त्या इराण्याकडे चहा घ्यायला थांबलों.

**मोहन** : तुला चहा सुचतोय्—इथं मृत्यूशीं गांठ आहे!

**जगू** : म्हणजे? घरवाल्याकडे वरतीं कुणीं मेलं कीं, कांहीं खुनबीन झालाय्?

**मोहन** : कुणी मेलं नाहीं नी कुणाचा खूनहि नाहीं—मी मरणार आहे!

**जगू** : काय?—तूं मरणार आहेस?—कां रे? काय, डोकं बिकं दुखतंय् कीं काय?

**मोहन** : छेः, मुळींच नाहीं.

**जगू** : मग—कांहीं तापबीप?

**मोहन** : नाहीं रे, बाबा, तापबीप कांहीं नाहीं.

**जगू** : मग मरतोय्स् कशानें! चांगला धडधाकट दिसतोय्स्! कांहीं अजीर्ण वगैरे झालंय् कां?

**मोहन** : अरे, बाबा, माझी ही व्यथा शारीरिक नसून मानसिक आहे. ती बरी होणं शक्यच नाहीं.

**जगू** : मग ?

**मोहन** : मग काय ? म्हणून मीं मरण्याचा निश्चय केला आहे. मी मरणार आहे—मी आत्महत्त्या करणार आहे.

**जगू** : अरे, पण—कां ते तर सांगशील ?

**मोहन** : मालतीचं नी माझं काल भांडण झालं. तुझ्याशीं लग्न करीत नाहीं म्हणून तिनं साफ सांगितलं. आतां मला जगणं शक्य नाहीं.

**जगू** : अरे—

**मोहन** : कांहीं बोलूं नकोस. जगू, तूं माझा जानी दोस्त म्हणून तुला इथं बोलावलंय् मी; माझा निश्चयी नी करारी स्वभाव तुला माहिती आहे इतका कुणालाच माहिती नाहीं—म्हणून मी तुलाच बोलावलं—कारण तूं मला माझ्या निश्चयापासून परावृत्त करण्याचा मुळींच प्रयत्न करणार नाहींस याबद्दल माझी पूर्ण खात्री आहे.

**जगू** : पण—

**मोहन** : पण—बीण कांहीं नाहीं. माझा ठाम निश्चय झाला आहे. त्यांत बदल होणं शक्य नाहीं. माझं मन बदलण्याचा प्रयत्न करणं व्यर्थ आहे.

**जगू** : तसा प्रयत्न करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. पण—( चिडखोर आवाजांत ) पण या साऱ्याशीं माझा संबंध काय ?

**मोहन** : हं—तें सांगतों. हें बघ, जगू, जगांतले मोठमोठे वीर केवळ घोड्यावर चांगलं बसतां येत नाहीं म्हणून लढाईंत अपेशी होतात—

**जगू** : तें मला माहित आहे; पण तुला सांगायचंय् काय ?

**मोहन** : त्या वीरांसारखंच माझं झालं आहे. मला आत्महत्त्या करायची आहे. पण अफू विकत घेण्याकरतां आठ आणे नसल्यामुळें मी तुला इतक्या तांतडीनं बोलवून घेतलं.

**जगू** : म्हणजे ?—मूर्खा, आठ आणे उसने मागण्यासाठीं माझी झोंपमोड केलीस तूं ?

**मोहन** : रागावूं नकोस, जगू. पण आज खरोखरच माझ्याजवळ दमडीहि नाहीं. वडिलांची मनीऑर्डर आज दुपारीं किंवा उद्यां येईल, पण मला आतां तितका मुळींच वेळ नाहीं. मी आत्तांच्या आत्तां सर्व निकाल लावून टाकणार.

**जगू** : तें ठीक रे, पण माझे पैसे परत कसे करणार तूं ?

**मोहन** : काय हलकट आहेस! माझ्यावर एवढा दुर्धर प्रसंग ओढवलेला आणि तूं खुशाल मस्करी करतोस ?

**जगू** : सॉरी हं, मोहन.—पण खरोखरच तूं आत्महत्त्या करणार ?

**मोहन** : अगदीं निश्चित.

**जगू** : अगदीं कांहीं झालं तरी निश्चय कायम ?

**मोहन** : अगदीं वज्रलेप.

**जगू** : ( टेबलावरल्या चिरूटांच्या पेटीशीं खेळत ) मोहन, तुझ्या जवळ येत चाललेल्या मृत्यूबद्दल मीं हळहळूं नये,—अश्रुपात करूं नये अशीच तुझी इच्छा,—होय ना ?—तूं समजूतदार माणूस आहेस. जें काय करायचं तें पूर्णपणें विचार करूनच तूं ठरवलेलं असणार. मीं तुला तुझ्या निश्चयापासून परावृत्त न करतां तुला मदत करावी, असंच ना तुझं म्हणणं ?

**मोहन** : होय—अगदीं माझ्या मनांतलं बोललास. मी मरून जाणार आहे, आणि मला अडथळा करणं बरं नाहीं. आज जर तूं मला अडवलंस तर पुढेंमागें मी आत्महत्त्या करीनच. माझ्या मर्जीविरुद्ध मला जिवंत ठेवणं कुणालाहि शक्य नाहीं. थोडक्यांत सांगायचं म्हणजे जें होणार आहे तें चुकणार नाहीं, हें समजून तूं मला मदत कर.

**जगू** : ( विचारांच्या तंद्रींतून जागा होऊन चिरूटांची पेटी हातांत घेतो. ) हं. असं आहे तर.—मग ही चिरूटांची पेटी घ्यायला हरकत नाहीं ?

**मोहन** : चिरूटांची पेटी ?

**जगू** : हो—हे चिरूट चांगले उंची आहेत आणि तूं मेल्यावर ते फुकट जाणार. (पेटींतले दोन चिरूट बाहेर काढून टेबलावर ठेवीत, पेटी खिशांत घालतो. ) यदाकदाचित् मरण्याच्या आधीं चिरूट ओढण्याची तुला हुक्की आलीच तर ठेवतो हे दोन.

**मोहन** : घे, घे ती पेटी खुशाल !

**जगू** : थँक यू—अरे, पण तुझी ती सोन्याची सिगारेट् केस् कुठं आहे रे ?

**मोहन** : आहे ना, उशीखालीं.

**जगू** : मग, घेऊं का ती मी ?

**मोहन** : माझी सिगारेट् केस् ?

**जगू** : मला फार आवडते बुवा, ती—मी आपलं स्पष्ट सांगतों.

**मोहन** : पण—ती सोन्याची आहे !

**जगू** : असेना का! तुला ती काय बरोबर नेतां येणार आहे?— नेलीस तर तुला जाळतील तेव्हां ती वितळून जाईल.

**मोहन** : (उशाखालची सिगारेट् केस् काढून त्याला देत, खवचटपणें) आणखीन् कांहीं हवंय् का?

**जगू** : अरे पुष्कळ हवंय् अजून. मला वाटतं, मेलेल्या माणसानं मागें ठेवलेल्या चिजांवर किती जिवंत माणसांचा डोळा असतो याची तुला कल्पनाच नाहीं. अर्थात् थोड्या वेळानं मरणाऱ्या माणसाशीं शांतपणें विचारविनिमय करण्याचं भाग्य फारच थोड्यांना लाभतं. मृत्युशय्येवर पडलेलीं माणसं असल्या गोष्टींची चर्चा करायला फारच नाखुष असतात. पण तुझं तसं नाहीं. तुझ्यासारख्या समजूतदार, व्यवहारी माणसाशीं अशा गोष्टी बोलायला कांहींच हरकत नाहीं.

**मोहन** : जग्या!—

**जगू** : ऐक रे. खरं म्हणजे तुझ्या मृत्यूनंतर माझ्यासारख्या तुझ्या जिवलग मित्राचा फायदा व्हावा, अशीच तुझी इच्छा असणार.

**मोहन** : जग्या—जग्या! मी जिवंत आहे अजून!

**जगू** : तें मला मुळींच कबूल नाहीं. तात्त्विकदृष्ट्या तूं जिवंत आहेस, पण बाकी सर्व दृष्टींनीं तूं मेल्यासारखाच आहेस. खरं सांगायचं म्हणजे कागदपत्रांवर सह्या करण्यापलीकडे तुझ्या देहाची आतां कांहींच किंमत नाहीं.

**मोहन** : कसले कागदपत्र?

**जगू** : तसे कांहीं महत्त्वाचे नाहींत; पण कांहीं कागदपत्र करणं जरूरीचं आहे. म्हणजे मृत्युपत्र करून सर्व मालमत्ता मला तूं द्यावीस

असं माझं म्हणणं नाहीं. कारण तसं देण्यासारखं विशेष तुझ्याकडे कांहीं नाहीं, हें मला माहीत आहे. पण, तुझ्या एक–दोन वस्तू मात्र मला जरूर लागतील. उदाहरणार्थ–हा ब्लॉक्.

**मोहन** : हा ब्लॉक् ?

**जगू** : हो, खूष आहोंत आपण या जागेवर. इतकी हवेशीर व स्वस्त जागा आपल्या खार गांवांत मिळणं शक्य नाहीं. आणि पुन्हां टेलिफोनचं हें एक्स्टेन्शन् तुला घरवाल्याकडून मिळालंय्–मला नेहमीं आमच्या घरवाल्याकडे जाऊन टेलिफोन करावा लागतो.

**मोहन** : अरे पण–

**जगू** : थांब रे. तुझं हें फर्निचरसुद्धां थोडं असलं तरी फार छान आहे, बुवा. मांडणी इतकीशी चांगली नाहीं तूं केलेली–पण हरकत नाहीं. मी बदलीन ती मग–आणि हीं टेबलावरचीं भिकार चित्रं मात्र मी काढून टाकणार, हं––मला बिलकुल पसंत नाहींत तीं !

**मोहन** : हीं चित्रं वाईट आहेत ?

**जगू** : बरं, तीं असतील कशीं तरी–तें राहूं दे रे–पण मला तुझ्याकडून या ब्लॉक्चा पोटभाडें करार करून घेतला पाहिजे. त्याचप्रमाणें फर्निचर विकत घेतल्याची पावतीहि करून घ्यावी लागेल. नाहीं तर तुझे नातलग किंवा तुझे कुणी सावकार माझ्यावरच उठतील ! ––मी तुला शंभर रुपये देईन या सामानाचे.

**मोहन** : बाबा, तीनशें रुपयांचं नुसतं फर्निचर आहे. चार महिने झाले नाहींत घेऊन !

**जगू** : तें कांहीं असो–शंभर रुपये पाहिजे तर घे.

**मोहन** : बरं—चल, काढ शंभर रुपये.

**जगू** : (हंसून) अरे वेड्या, शंभर रुपये द्यायचे म्हणजे खरोखर द्यायचे नाहींत. तसं करणं मूर्खपणाचं होईल. घटकाभरानं जो माणूस मरणार आहे, त्याला शंभर रुपये कोण देईल ? तें म्हणजे असं आहे, मोहन, तूं शंभर रुपये मिळाल्याची पावती मला द्यायची म्हणजे मला कुणाचा त्रास व्हायचा नाहीं.

**मोहन** : अस्सं ?

**जगू** : हं—तशी आपली पावती असलेली बरी. त्या खणांत कागद असतील ना ? ( उठून टेबलाचा खण उघडतो. कागद काढतांना एक पत्र त्याच्या हातीं येतें. पत्रावर डोळे फिरवीत ) हें मालतीसाठीं शेवटचं पत्र लिहून ठेवलंयस् वाटतं ?

**मोहन** : ( त्याच्या अंगावर ओरडतो ) जग्या, तें पत्र आधीं खालीं ठेव बघूं ! खासगी पत्र आहे तें.

**जगू** : ( लिफाफा फाडून पत्र वाचीत ) अरे, आतां या शेवटच्या घटकेला कसलं खासगी नी कसलं पब्लिक ! ( पत्र वाचणं संपवून ) कायरे हें ?—वेड्या, शेवटचं पत्र असं का कुणी लिहितात ? किती नाटकी वाटतं हें !—काय म्हणे 'हृदयेश्वरी !—ज्या वेळीं मी दिक्काळाच्या पलीकडे गेलेला असेन !' छे ! छे ! असलं पत्र बिलकुल लिहितां कामा नये !

**मोहन** : कां, काय झालं रे त्या पत्राला ?

**जगू** : ह्यः ! एखाद्या कादंबरींतल्या नायकानं नायिकेला लिहिल्यासारखं दिसतं तें. हें बघ, मोहन, मला फार छान लिहितां येतात पत्रं. मीच देतो तुला एक लिहून.

**मोहन** : म्हणजे माझ्या पोरीला पत्रं लिहायचं कामसुद्धां तूंच तुझ्यावर घेतोयस् ?

**जगू** : अरे, तुला शक्य तितकी मदत करायचा मी प्रयत्न करतो आहे.–हो बरी आठवण झाली. मालतीला घेऊन उद्यां तूं 'मेट्रो'ला जाणार होतास ना ? मग ती कालच काढून ठेवलेलीं रिझर्व्ह तिकिटं कुठं आहेत ? ( टेबलाच्या खणांतले कागद चाळीत ) हीच कां तीं ? —अरेरे ! आतां कसचा जातोस तूं उद्यां 'मेट्रो'ला. मलाच दे तीं. मलाही तो 'शो' पहायचाच आहे !

**मोहन** : काय–काय ?

**जगू** : अरे ' काय काय ' काय ?–दोन्हीं दे तीं. मालतीला मीच नेईन. कोण जाणें तूं मेल्यानंतर कदाचित् ताबडतोब माझ्याबरोबर यायला ती कांकूं करील–पण आतां या सुधारणेच्या दिवसांत कोण धरतो कुणाचं सुतक ? समजा नाहींच ती आली, तर दुसरी कुणी तरी पोरगी नेईन मी बरोबर. पण मला वाटतं मालती येईल माझ्या-बरोबर. तशी ती खूष आहे माझ्यावर !

**मोहन** : ( लालबुंद होऊन ) जग्या गाढवा ! माझ्या चीजवस्तूंची मी तुला लूट करूं दिली–माझी खोली चोरण्याची तुझी नीच युक्ति पसंत केली–माझ्या फर्निचरची मांडणी बदलण्याचा तुझ्या आचरट कल्पनेला मी ' नाहीं ' म्हटलं नाहीं. पण–पण माझी पोरगी उपट-ण्याची तुझी ही दुष्ट, हलकट, उलट्या काळजाची—

**जगू** : ( आश्चर्य व्यक्त करून ) अरे, मी हें सगळं तुझ्या बऱ्या-करितांच करतो आहें ना ? तुझी तशी इच्छा नाहीं कीं काय ?

**मोहन** : वाः ! प्रत्येक गोष्टीला कांहीं मर्यादा म्हणून आहेच कीं नाहीं ? मालतीबद्दल तूं असं भलतंसलतं बोलशील असं मला वाटलं नव्हतं—तिच्याविषयीं तुझ्या मनांत असे पापी विचार—

**जगू** : हं–हं–मोहन, असले शब्द मात्र मी तुला बोलूं देणार नाहीं. मी कधींहि तिच्याबरोबर उगाच बोलत बसलों नाहीं, कीं कधीं विनाकारण तिच्या घरीं गेलों नाहीं–तूं वाटेल तें बोल, पण असलं कांहीं तरी बोलूं नकोस !

**मोहन** : असलं म्हणजे ?

**जगू** : असलं म्हणजे, तुझ्या दोस्तीचा फायदा घेऊन मालतीला तुझ्यापासून उपटण्याचा मीं कधींच प्रयत्न केलेला नाहीं, हें तुला कबूल करावंच लागेल. तसं मीं कधीं केलं नाहीं, आणि केलं नसतंहि. पण आतां सगळंच निराळं झालं आहे. तूं आतां मरण्याचा वज्रलेप निश्चय केला आहेस. तेव्हां मी मालतीच्या मागें लागलों नाहीं तर दुसरा कुणी लागेल; आणि मालतीनें माझ्याशीं लग्न नाहीं केलं तर दुसऱ्या कुणाशीं तरी ती करील. तुला आवडेल तें ? अरे, दुसऱ्या कुणाहिपेक्षां मालतीनें माझ्याशींच–तुझ्या सगळ्यांत प्यार अशा मित्राशींच लग्न करावं, अशीच तुझी शेवटची इच्छा असणार. खरं कीं नाहीं ?

**मोहन** : चुलींत गेला तो सगळ्यांत प्यारा मित्र ! जग्या, मी मरूं शकतों तसा जगूंहि शकतो. तूं काय समजलास ? माझ्या जिवाचं मी वाटेल तें करीन. माझ्या जिवाचा मी धनी आहें. मी माझ्या फायद्याकरता मरणार होतों. पण बघतों तों तुझाच सगळा फायदा होतो आहे ! मग मरण्यांत अर्थ काय ? बस्स, ठरलं. जगायचं. आत्महत्त्या

बित्महत्त्या कुछ नहीं ! चल, दे ती माझी चिरूटांची पेटी नी सिगारेट् केस. काढ बाहेर. आटप.

**जगू** : ( खिन्नपणें पेटी आणि सिगारेट् केस परत देत ) जातों तर मी घरीं—झोंपतों तरी स्वस्थ—उगाच मला सकाळच्या प्रहरीं त्रास दिलास.

( इतक्यांत टेलिफोनची घंटा वाजते. मोहन जाऊन टेलिफोन घेतो. )

**मोहन** : हलो—हलो—हो मी मोहन—कोण ? मालती ? खरंच—खरंच ? ( रिसीव्हर तसाच हातांत धरून जगूकडे वळून ) अरे मालती म्हणते 'त्या कालच्या भांडणांत कांहीं अर्थ नाहीं'—ती माझ्याशींच लग्न करणार नी लवकरच करणार—

**जगू** : थांब—थांब—तो तसाच धर टेलीफोन—मला बोलूं दे—( टेलिफोनजवळ जातो. )

**मोहन** : ( टेलिफोनमध्यें ) मालती—हा जगू बोलतोय्. ( टेलिफोन त्याच्या हातांत देतो. )

**जगू** : कॉंग्रॅट्स, मालतीताई. आधीं माझे आभार माना.—मी मोहनचा जीव बचावला आज !—तें सर्व मग सांगेन—हं—बरं बरं. ( टेलीफोन खालीं ठेवतो. )

**मोहन** : हें आणखी वर का ? तूं माझा जीव बचावलास ?—

**जगू** : नाहीं तर ?

**मोहन** : बरं आहे बाबा !

( कपाळावर हात मारतो, आणि खालीं बसतो. )

## ७

# पैजार—

( **वेळ** : सूर्योदय होऊन थोडा वेळ झाला आहे. )

( **स्थळ** : शिवगडाच्या पायथ्याशींच असलेल्या जंगलांतील, एक हजारी मनसबदार हंबीरराव मोहित्यांच्या सैन्याचा तळ. खुद्द खाशांच्या तंबूबाहेरील बैठकीची जागा. हिरोजी बैठक झटकून साफसूफ करीत आहे. सर्फोजी प्रवेश करतो. सर्फोजी वय वर्षे अठ्ठावन. शरीर रुबाबदार व कमावलेलें. )

**सर्फोजी** : खाशांची स्वारी आली कीं काय फेरफटका करून ?

**हिरोजी** : ( स्मित करीत ) छेः, खासे आता एवढ्यांतच कुठले येतात !

**सर्फोजी** : खाशांची स्वारी आली नाहीं ? मग तूं इथं कसा ?

**हिरोजी** : अहो मी इथं कसा म्हणजे काय ? आता कशाला ते आम्हाला नेतील बरोबर ?

**सर्फोजी** : म्हणजे ? ते आज एकटेच गेले वाटतं घोडा घेऊन रपेटीला ?

**हिरोजी** : आजच ? काल पहाटें सुद्धां एकटेच गेले होते !

**सर्फोजी** : म्हणजे ?

**हिरोजी** : अहो, म्हणजे काय ? नाजूक कामं कुठं दोघांनीं होतात होय ?

**सर्फोजी** : काय म्हणतोस काय तूं , हिऱ्या ?

**हिरोजी** : एक फुलपाखरू पाहिलं आहे रानांत खाशांनी. रानवट पण देखणं बघा ! परवा अगदीं तांबडं फुटायच्या आत नाही का गेलों होतों रपेटीला आम्ही ? मोठी मौज झाली तेव्हां ! नुकतं कुठं दिसायला लागलं होतं. खूप दूर गेलों होतों आम्ही घोडा दवडीत. घोडे दमले म्हणून एका ओढ्याच्या काठाशीं थांबलों. तिथं दोन चार पोरी आल्या होत्या पाणी भरायला. कुणबाऊ पोरी !—पण त्यांतली एक बया होती फारच देखणी—देखणी म्हणजे अगदीं चंद्रासारखी ! स्वारीचे डोळे कांहीं केल्या हालेनात तिथून. अंगावर पटकुरें होतीं बघा, सर्फोजी; पण काय रत्न होतं म्हणून सांगू तुम्हाला ! खाशांची स्वारी तर काय उल्लूच झाली बघा ! अगदीं विरघळला शिपाई. पण ती पोरगी चपापली या उमद्या स्वाराला बघून. अन् हातांतली कळशी पडली ओढ्यांत. मग काय संधीच आली चालून ! डोळयाचं पातं लवतं न लवतं तोंवर दिली सरकारनीं बाहेर काढून. काय लाजून चूर झाली होती, सर्फोजी ! अन् झाली मग हळू हळू पूसतपास. घरीं कुणी नाहीं. फक्त म्हातारी आई आहे म्हणाली. नांव सई—बरं का—सई ! सरकार स्वारी गेली

असती पाठून. पण ती गेली कळशी घेऊन पळून ! अन् तेंव्हांपासून सकाळच्या फेरफटक्याला नाहीं नेत आम्हाला सरकार ! पोरगी मात्र अगदी लाखांत आहे बरं !

**सर्फोजी** : अस्सं ! सध्या ही शिकार चालली आहे वाटतं ?
( घोड्याच्या टॉपा ऐकू येतात ).

**हिरोजी** : आलीच वाटतं स्वारी !

( हंबीर प्रवेश करतो. वय वर्षे सत्तावीस, उमदा, तेजस्वी शिपाई गडी. चेहरा आनंदी, रंगेल पण तितकाच करारी. भरधांव घोड्यावरून रपेट केल्यामुळें शरीर घामानें भिजून गेलें आहे. कपडे विस्कळित झाले आहेत. पटका काढून घाम पुसतो )

**हंबीर** : हिरोजी, निळ्याला आंत बांधून ठेव. जा ( बैठकीवर बसत ) सर्फोजी ?

**सर्फोजी** : जी हुजूर !

**हंबीर** : त्या विजापूरच्या कुत्र्याची काय हवाल ?

**सर्फोजी** : अजून कांहीं तलास लागला नाहीं, हुजूर.

**हंबीर** : मराठ्यांच्या हेरांची अवलाद इतकी बेंगरूळ कधींपासून झाली ? उभ्या जंगलाला खांडववनासारखी आग लावा हवी तर. गवसत नाहीं म्हणजे काय ? हणमंतराव निंबाळकर आणि त्याची ती मगरूर कारटी उद्यां पहांटेच्या आंत गिरफदार झालीच पाहिजेत. शिवाजीराजांच्या भर दरबारांत आठ दिवसांत शिवगड काबीज करून त्या हरामखोराला काढण्या लावून महाराजासमोर आणून उभा करतो, असा विडा उचलून आम्हीं आलों आहोंत, माहीत आहे ना ? शिवगड तर केव्हांच काबीज झाला, पण मुलीला घेऊन तो हरामजादा कुठं

जंगलांत दडून राहिला आहे तो अजून मिळत नाहीं म्हणजे काय ? हेरांची काय खबर आहे आज ?

**सर्फोजी** : म्हाळसाईच्या डोंगरालगतच्या जंगलांत तो लपून राहिला आहे ही बातमी चुकीची होती सरकार. तो याच शिवगडच्या पायथ्यालगतच्या जंगलांत नक्की असावा असं हेर म्हणतात.

**हंबीर** : काय ? याच जंगलांत ? आणि आम्हाला अजून गवसत नाहीं ?

**सर्फोजी** : आज शिकस्त करणार आहेत हेर, सरकार.

**हंबीर** : महारानांसमोर केलेल्या माझ्या एकट्याच्या प्रतिज्ञेचा प्रश्न नाहीं, सर्फोजी ( कमरेचा पट्टा चांचपत ) आज चार वर्षं सतत उराशी बाळगून ठेवलेल्या सूडाचा निखारा—होय, सूडाचा निखारा—तो मला विझवायचा आहे एकदां !—माझी लाडकी ताई—बाळ गजरा—तिला मरतांना दिलेला शब्द मी पुरा केला नाहीं तर, तर—नाहीं—त्या हणमंत्याला आणि त्याच्या कारटीला प्रत्यक्ष काळाच्याही जबड्यांतून ओढून काढीन, पण त्यांचा सूड घेतल्याशिवाय राहाणार नाहीं. ( एकदम कमरपट्टयांतून स्त्रीच्या पायाचा एक भरजरी पैजार काढून ) पाहिलात हा पैजार, सर्फोजी ?

**सर्फोजी** : हें काय सरकार ? हा पैजार कुणाचा ?

**हंबीर** : हा पैजार त्या निंबाळकरांच्या कारटीचा—वृंदेचा !

**सर्फोजी** : काय ? मग निंबाळकरांचा तलास स्वतः स्वारीला लागला तर ?

**हंबीर** : छेः, हा पैजार आज चार वर्षं माझ्या कमरपट्टयांत आहे. ( पैजार पुन्हां कमरपट्टयांत ठेवतात. )

**सर्फोजी** : चार वर्ष ? म्हणजे ?

**हंबीर** : म्हणजे ! चार वर्षांपूर्वी मी शिवराजांचा एक हजारी मनसबदार—सर्फोजी, निंबाळकराच्या मुलखांत बैल हांकून स्वतःच्या म्हाताऱ्या आईला आणि लहानग्या बहिणीला पोसणारा एक गरीब कुणबाऊ पोर होतो !

**सर्फोजी** : थट्टा करतां सरकार माझी ?

**हंबीर** : थट्टा नाहीं, सर्फोजी. त्या गोष्टी आठवल्या म्हणजे काय करूं नी काय नाहीं असं होतं !

**सर्फोजी** : कसल्या गोष्टी सरकार ?

**हंबीर** : शिवाजी महाराजांनीं मुलुखगिरी चालवली होती तेव्हां; आणि ह्या मुसलमानांच्या कुत्र्याची—निंबाळकराची तर महाराजांशी जन्माची दुष्मनगिरी. मग काय ? आमच्यासारख्या महाराजांची बाजू घेणाऱ्यावर त्याचा केवढा दांत ! मी मिळालों शेवटीं एकदां त्याच्या तावडींत. शिवाजीशी संगनमत केल्याचा आरोप माझ्यावर ठेवून गांवांतून हांकलून काढून माझ्या मोडक्या घरावर नांगर फिरवण्याचा त्यानं हुकूम सोडला. माझी म्हातारी आई जिवंत होती तेव्हां; आणि माझी धाकटी बहीण गजरा कफक्षयानं अंथरुणावर होती. अवघी चवदा वर्षांची पोर होती ती.

**सर्फोजी** : अरेरे !

**हंबीर** : मला घर सोडून जायचा हुकूम झाल्यावर दुसऱ्याच दिवसाची गोष्ट. संध्याकाळची वेळ होती. काळोख पडत होता. जरा बरं वाटत होतं म्हणून माझी बहीण बाहेर ओट्यावर येऊन बसली

होती. शेजारच्या दोन तीन पोरी तिच्याजवळ होत्या. इतक्यांत त्या निंबाळकराच्या कारटीचा—वृन्देचा—मेणा आला. बरोबर तिची दासी होती वाटतं. मेण्याचा दांडा जरा कोठें सरकला म्हणून भोयांनीं मेणा खालीं ठेवून तो ते नीट करीत होते. वृन्दा आणि तिची दासी मेण्या-तून उतरून बाजूला उभ्या राहिल्या होत्या. माझ्या बहिणीची कोणी तरी मैत्रिण तिला म्हणाली वाटतं, गजरा जा आणि ताईसाहेबांचे पाय धर; म्हणजे हंबीर दादाला क्षमा करायला सांगतील त्या राजेसाहेबांना! बिचारी गजरा! धावली तशीच! आणि वृन्देच्या पायावर पडून लागली गयावया करायला! वृन्देची दासी फिदि फिदि हंसायला लागली म्हणे—नाहीं—नाहीं अगदीं सहन होत नाहीं मला, सर्फोजी!

**सर्फोजी** : मग काय झालं सरकार?

**हंबीर** : होणार काय? ती दासी म्हणाली, “ बघतां काय त्या गावंढळ अवलादीकडे ताईसाहेब? मेणा नीट झाला. द्या उडवून तिला अन् चला ” आणि—सर्फोजी निंबाळकरांच्या त्या मगरूर कार्टीनं जोरानं लाथ झटकली, त्यासरशीं माझी गजराताई—माझी आजारी गजरा कोलमडून बाजूला पडली. पण पडतां पडतां लाथ झटकतांना वृन्देच्या पायांतून उडालेला जरीचा पैजार, बाजूला पाचोळ्यांत पडला होता,. तो तिला दिसला. वृन्देच्या दासीनें इकडे तिकडे शोधला तो पैजार, पण काळोखांत तिला कुठें मिळाला नाहीं तो! जाण्याची तर त्यांना फार घाई होती. सांपडेचना तेव्हां तशाच त्या मेण्यांतून पुढें निघून गेल्या. गजरा तशीच उठली, तो पैजार उचलून तिनं पदराखालीं घेतला आणि मैत्रिणीच्या सहाय्यानें आंत येऊन अंथरुणांत पडली. तोच हा पैजार; सर्फोजी, तोच हा पैजार!

**सर्फोजी** : अजून तुमच्याजवळ आहे, सरकार ?

**हंबीर** : अजून आहे ? होय अजून त्याचं कामं नाहीं झालं, सर्फोजी ! गजरा कुळवंत मोहित्यांची मुलगी होती. गरीब असली तरी तिचा मानी जीव त्या अपमानानं भाजून निघाला. रात्रीं मी घरीं येऊन पाहातों तों तापानं ती लालबुन्द झाली होती. सारी रात्र मी तिच्या-जवळ बसून काढली. थरथरत्या ओठांनीं तिनं मला सर्व हकिकत सांगितली, आणि हा पैजार पदराखालून काढून माझ्याजवळ दिला. आणि त्यानंतर ती बोलली नाहीं, ती पुन्हा बोललीच नाहीं. चारच दिवसांनीं तिनं हा लोक सोडला. आणि मीही म्हातारीला घेऊन घर सोडून चालता झालों. तेव्हां, सर्फोजी, तेव्हां—याच पैजारानं निंबाळ-कराच्या पोरीचं थोबाड फोडून काढल्याशिवाय रहाणार नाहीं म्हणून गजरेच्या हातावर हात देऊन ती प्रतिज्ञा केली. समजलं मी या स्वारी-वर यायला इतका अधीर कां झालों होतों तो ? ( बाहेर मोठा कोला-हल ऐकूं येतो. शिंगें वाजतात. हिरोजी धांवत प्रवेश करतो. )

**हिरोजी** : ( मुजरा करून ) सरकार, निंबाळकर आणि त्याची पोरटी गिरफदार करून आपल्या हेरांनीं आणली.

**हंबीर** : काय ?—एकदम घेऊन ये त्या पोरीला इथं; त्या म्हाता-ऱ्याला काढण्या लावून ठेवा.—सर्फोजी, आली वेळ !

**( वृन्देला हिरोजी आंत घेऊन येतो. खालीं मान घालून वृन्दा निश्चल उभी राहाते. )**

**हंबीर** : ( तिच्या तोंडाकडे पाहातो ) अं:—कोण ? सई ?—

**( वृन्दा वर पाहाते. भूत पाहिल्यासारखी बावरते, आणि गोरीमोरी होऊन खाली पहात उभी राहते. सर्फोजी दोघांच्याही चेहऱ्याकडे पहात आश्चर्यचकित होऊन उभा राहातो. )**

**हंबीर** : हं ! ( त्याचा चेहरा उग्र होऊ लागतो. त्याचे डोळे शून्यपणें कांहीं तरी पाहूं लागतात. ) निंबाळकरांची वृन्दा ! तूं वृन्दा ?

**वृन्दा** : होय, मी वृन्दा.

**हंबीर** : ( कमरपट्ट्यांतला पैजार बाहेर काढून तिच्यापुढें धरतो. ) हा पैजार ओळखलास ? पहा,–कर आठवण. ( तिच्या हातांत देतो. ) झाली आठवण हा कुठं हरवला होता त्याची ? ( वृन्देच्या हातांतून पैजार खालीं पडतो. ती खालीं मान घालते. ) त्या गांवंढळ पोरीचा मी भाऊ–हंबीरराव मोहिते ! समजलं ?–सर्फोजी, उचला तो पैजार आणि काढा दोन्ही थोबाड फोडून हिची माझ्यासमक्ष ! ( सर्फोजी पहातच उभा राहतो ) ऐकलंत कीं नाहीं, सर्फोजी ?

**सर्फोजी** : जी हुजूर. ( पैजार उचलतो. वृन्देच्या गालाकडे क्षणभर पहात रहातो. त्याचा हात कांपतो. )

**हंबीर** : सर्फोजी, उडवा.

( सर्फोजी तिच्या गालावर फाड फाड मारतो, आणि पैजार बाजूला टाकून खालीं मान घालून उभा राहातो. वृन्दा तांबडीलाल होऊन न हालता ताठ उभी रहाते. तिचें शरीर थरथर कापतें आहे. ओठ फुटेपर्यंत तिनें दांत दाबून धरले आहेत. )

**हंबीर** : ( शान्त होत तिच्याकडे पाहात रहातो ) तूंच सई ?

( वृन्दा अगदीं दगडी पुतळीसारखी ताठ उभी आहे. तिच्या डोळ्यांतून पाणीही येत नाहीं. )

**हंबीर** : सर्फोजी, उचला तो पैजार. सईचा मी महान् अपराधी आहे. उडवा माझ्या दोन्ही गालावर.

( हंबीर त्याच्या तोंडाकडे पहातच राहातो. वृन्दा पण त्याच्याकडे पहात राहाते. )

**हंबीर** : ( ओरडून ) सर्फोजी, हुकूम पाळला नाहीं तर काय होतं तें माहीत आहे ना ?

**सर्फोजी** : जी हुजूर. ( पैजार उचलतो आणि यांत्रिक बाहुली-प्रमाणें त्याच्या गालावर एकेकदां फाड फाड मारून पैजार बाजूला फेकून देऊन तडक बाहेर निघून जातो. )

**हंबीर** : सई !

( वृन्देच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागतात. तिचा तोल जातो. हंबीर तिला आपल्या हातावर सांवरतो. )

# ८

## संप—

(दुपारचे चार वाजून गेले आहेत. आकाश अभ्राच्छादित असल्यामुळें जरा काळोख पडल्यासारखा दिसत आहे. मागच्या बाजूस एक कालवा असून तेथपासून तों पुढच्या मोकळ्या जागेपर्यंत ' कारखान्या'च्या आवाराची भिंत दिसत आहे. आजूबाजूला दूरदूर पसरलेलीं शेतें आणि अंधुक अंधुक टेकड्यांच्या आकृती दिसत आहेत. पुढच्या उघड्या जागेंत बऱ्याचशा कामगारांची गर्दी जमली आहे.

कारखान्याच्या भिंतीच्या कोनाशीं दहाबारा पिंपावर फळ्या टाकून एक कामचलाऊ व्यासपीठ तयार केलें आहे. अखिल भारतीय कामगार संघाचे मुख्य चिटणीस श्री. माने व्यासपीठावर उभे आहेत. व्यासपीठाच्या बाजूलाच, जमलेल्या लोकांपासून जरा दूर अंतरावर भिंतीला टेकून जगदेव जाधव उभा आहे. दूर कालव्याच्या कांठाशीं दोन गांवकरी सर्व मजा पहात उभे आहेत.)

**माने** : ( उजवा हात पुढें करून ) विचार करून पहा. संघाचं म्हणणं काय आहे तें मी तुमच्यापुढं ठेवलंच आहे; आणि कितीही कंठशोष केला, तरी या पलीकडे संघ कांहींच करूं शकत नाहीं.

**यल्लप्पा :** ( हा रंगानें काळा कुळकुळीत असून तोंडावरून धारवाड कर्नाटकच्या बाजूचा दिसतो. ) हे बघा साहेब, मला काय इचारायचं हाय. आमच्यांतल्या कांहीं लोकांनीं दगाबाजी तर केली न्हाइना ?

**साटम :** ( दांत चावून धमकीच्या स्वरांत ) करूं द्या तर खरी दगाबाजी कोणाला, मग अ—अ—

( जमलेली गर्दी खवळल्यासारखा आवाज येतो. )

**गणू तांबट :** ( रुंदट चेहेऱ्याचा एक ठेंगणासाच कामगार ) पण त्यांना असलीं दगलबाज माणसं मिळणार कुठनं ?

**साखळकर :** ( एक उंच, तरतरीत, गाल बसलेल्या पण भांड-खोर चेहेऱ्याचा माणूस. ) अरे दगलबाजी तर जिकडे तिकडे आहे. त्यांची अवलादच तसली मुळीं. वीतभर पोट जाळण्याकरतां शेण खाणारीं माणसं काय थोडीं आहेत ?

( पुन्हां गर्दीतून संतापलेल्या लोकांची गडबड ऐकूं येते. वृद्ध जावजी मास्तर सभेंत येतात; आणि अगदीं पुढच्या रांगेंत येऊन उभे राहतात. )

**माने :** [ पुन्हां हात वर करून ] छे, छे, दगाबाजी सोडून द्या, पण थोडा शांतपणें विचार करा. आज तुमच्या मागण्याप्रमाणें जर संघ वागूं लागला, तर आणखी दहा संप संघाच्या मानेवर बसतील. आणि संघाच्या पैशाची स्थिती तुम्हाला माहितच आहे. मजूरसंघ न्याय मिळविण्याकरितां जन्माला आले आहेत आणि न्याय म्हणजे कांहीं तुमच्याच बाबतींत न्याय असं नव्हे. सर्वांचाच विचार न्याय-दृष्टीनें केला पाहिजे. कुणीही सरळ मनुष्य तुम्हाला सांगेल कीं तुम्हाला चुकीची चिथावणी मिळत आहे म्हणून. मी असं म्हणत नाहीं कीं

तुम्हीं वाजवीपेक्षां फाजील मागण्या करतां आहां; पण एवढं तरी खास कीं या क्षणीं तुमच्या मागण्या जरा जडच दिसतात. स्वतःला या भयंकर स्थितींत तुम्ही आणलं आहे खरं, पण आतां त्यांतून सुटका कशी करून घ्यायची याचा विचार नको का करायला ? मी सांगतों त्याचा पुन्हां विचार करा.

**लखू** : ( एक घाटवळी कामगार ) अक्षी बराबर साह्यब. ह्येच इचार खरा !

( गर्दींत पुन्हां गडबड उडालेली दिसते. झटकन् पुढें येऊन शिवराम पवार जावजी मास्तरांच्या शेजारीं उभा रहातो. )

**माने** : जरूर तेवढी आपल्या मागण्यांत पड घ्या, आणि मग संघ तुमच्या पाठीशीं उभा आहे हें ध्यानांत ठेवा. असाच हट्ट धरून राह्यलांत, तर मग आमचे उपायच हरले ! मग मात्र या संपाशीं संघ आपला सारा संबंध तोडून टाकील. मी उगाच एक शब्दही बोलत नाहीं, हें तुम्हाला माहीतच आहे. मला वाटतं तुम्ही विचारी माणसं आहां. तुम्हाला कुणी कांहींही जरी सांगितलं–( मान्यांचे डोळे जगदेव जाधवावर लागले आहेत. ) तरी तुम्हाला मी निक्षून सांगतों कीं संघ सांगतो तें ऐका, आणि मग तुमच्या मागण्या आम्हीं मिळवून देतों कीं नाहीं तें पहा ! बोला. काय करणार ? सर्वांनीं मिळून या लढ्याचा शेवट आपल्या विजयांत करणार, कीं सांप्रतच्या भुकेकंगाल अवस्थेंत तडफडत मरणार ?

( गर्दींत बराच वेळ कुजबूज सुरू होते. )

**यलप्पा** : ( तोंड वाकडें करून ) म्हाइत नाय अजून सायबाला, आमचं कसं हाल व्हतायत् ते !

**माने** : ( आवाज चढवून ) माहीत नाहीं ? ( ओठ थरथरत ) शहाण्या गृहस्था, मी सुद्धां या साऱ्या हाल अपेष्टांतून गेलों आहे बरं ! मी सुद्धां अगदीं दारिद्र्यातूनच या स्थितीला पोहोंचलों आहे. संघ नव्हते हल्लींच्यासारखे माझ्यावेळी. संघांचं सारं बळ एकजुटींत आहे. मजुरांचीं दुःखं काय आहेत, तीं मला कळताहेत म्हणूनच मी तुमच्या सेवेला वाहून घेतलं आहे, समजलांत? हालांच्या गोष्टी तुम्ही मला काय सांगता ? पण सर्वांच्या हितांकरितां थोड्यांनीं पड खाल्ली पाहिजे. संघाचं म्हणणे ऐका. तडजोडीला कबूल व्हा, आणि संघ तुम्हाला मदत करायला एका पायावर तयार आहे.

( लोकसमुदायावर नजर रोखून माने स्तब्ध राहतात. क्षणोक्षणीं कुजबूज वाढूं लागते. पांच सहा, पांचसहा जण एकत्र जमून कामगार आपसांत बोलूं लागतात. साटम, सावळे आणि लखू एके ठिकाणीं बोलूं लागतात. )

**लखू** : मानेसाब अक्षी खरं बोलत्यात !

**सावळे** : ( शांतपणें ) हं. दोन महिन्यांपूर्वीं मी हेंच सांगत होतों बरं !

( कालव्याच्या कांठीं उभे असलेले ते दोघे गांवकरी सभेकडे पहात हंसतात. )

**लखू** : झालं काय यास्नी हसाया ?

**साटम** : ( गुरगुरत ) पुरें म्हणावं हांसू तुमचं; नाहीं तर इकडचं तोंड तिकडे करून ठेवीन.

**यल्लुप्पा** : ( एकदम मान्यांकडे पहात ) भट्टीखात्यांत पगार काय देत्यात म्हाइत हाय तुमास ? पुरा हाय का तो ?

**माने** : मी कधींच म्हणालों नाहीं कीं भट्टीखात्यांतले पगार भरपूर आहेत म्हणून. माझं म्हणणं हेंच कीं दुसऱ्या कारखान्यांतून सुद्धां भट्टीखात्यांतले पगार एवढेच आहेत.

**साखळकर** : अजीबात खोटं ! ( गडबड होतें. ) टाटाच्या कारखान्यांत भट्टीखात्याचे पगार काय आहेत हो ?

**माने** : ( जरा नाक मुरडून ) मला खोटं बोलायचं नाहीं. पण टाटाच्या भट्टीखात्यांत काम किती आहे माहीत आहे आपणाला ? त्या मानानं पगाराचं प्रमाण हेंच पडतं !

**राजा पवार** : ( शिवराम पवारचा धाकटा भाऊ ) रात्रीच्या कामाची डबल सवाई मिळवून द्यायला तयार आहां तुम्ही ?

**माने** : खात्रीनें !

**यल्लप्पा** : संपासाठीं काढलेल्या आमच्या वर्गणीचं काय झालं, साह्यब ?

**माने** : ( भिवया वर चढवून ) एकदां मी सांगितलं आहे त्या पैशांचं काय करणार तें.

**साखळकर** : करणार ! कधीं करणार ? आमच्या सोबत्यांपैकीं एका एकानें हळूहळू फुटून जावं अशी तुमची इच्छा दिसते !

( गडबड होते. )

**साटम** : ( ओरडून ) बस करा ती गडबड.

( साखळकर रागानें मागें पहातो. )

**माने** : ज्याला म्हणून थोडासा मेंदू शिल्लक आहे, त्याला कळेलच कीं, संघ म्हणजे कांहीं चोरांची टोळी नव्हें कीं लबाड लुटारूंचा अड्डा नव्हें. मी माझं म्हणणं तुमच्या पुढें स्पष्ट ठेवलं आहे. मित्र हो, अंतः-करणपूर्वक विचार करा. तुमच्या सेवेला मी तयारच आहे.

( माने खालीं उडी मारतात. लोक त्यांना जायला वाट करतात. कालच्याच्या कांठचा एक गांवकरी मान्यांकडे हांसत पहात रहातो. कामगार लोक चारपांच,

चारपांच एकत्र जमून बोलत उभे राहतात. बाजूला उभ्या असलेल्या एकट्याच जगदेव जाधवाकडे मधून मधून ते पहातात. )

**साखळकर :** तुम्हाला फोडण्याचा उपदेश आहे मान्यांचा. आमच्याशीं दगलबाजी करायला शिकवतो आहे तो तुम्हांला. सपातून फुटून पोट भरण्यापेक्षां डोकं आपटून प्राण देईन मी !

**साटम :** कोण बोलतोय तो फुटण्याच्या गोष्टी ? जरा जीभ आवरून बोला महाराज !

**विठ्या लोहार :** ( पोरगाच पण शरीरानें दणकट आहे. ) बायकोपारांची काय हवाल ?

**साखळकर :** आमचं जे होणार तें त्यांचं !

**विठ्या लोहार :** तुझ्या सारख्या लग्न न झालेल्या फटिंगाची गोष्ट निराळी !

**साखळकर :** हवीं आहेत कोणाला लग्नं ?

**जावजी मास्तर :** ( आवाज चढवून ) पोरांनों, मी सांगतो तेवढं ऐका. लढलो खूब आपुण आतां. शेटलोकांशीं तडजोड करायला हुकूम द्या आमाला, मग बघून घेतों काय ते आमी.

**लखू :** वर जाऊन बोला कीं, मास्तर.

( जावजी मास्तरच्या नावाची ओरड होते. झाताऱ्याला लोक पुढें ढकलतात. मास्तर वर चढतात, आणि गडबड शांत व्हावयाची वाट पहात उभे रहातात. गडबड एकदम शांत होते. )

**जावजी मास्तर :** आपना सर्वांचं दुःख सारखंच हाय, काय ? आनी हे सगळं का, तर आपलं आतां दैवच फिरलं हाय म्हनून.

**राजा पवार :** नाहीं, नाहीं, हे संघवाले हरामखोर !

**जावजी मास्तर** : बाबानु, मुंबयवाले बी नाय, आनि संघवाले बी नाय काय करीत. आतां आपलं नसीबच्च फिरलं हाय. आनि बर्मलिखितापुढें कोनाचं काय बी नाय चाललं. येकदां त्येच्या फेऱ्यांत पडला की मानूस मेलाच ! आज काळ्याचे केस पांढरे झाले बाबानु, आनि म्हाताऱ्याचा हा आपला अनुभव हाय. इच्यार करा. एकदां भगवान् कोपला मग धडपड करू न्ये आपुन ! इनाकारन बायका पोरास ह्या हालांत किती रोज ठेवनार आपुन ? ह्ये पुरं नाय झालं ?

( लोक हंसतात. मास्तर रागावल्यासारखे दिसतात. )

दात नका काढूं. बजावून सांगतो, माझा म्हाताऱ्याचा शब्द खरा होयल बघा. मी दगाबाजी नाय शिकवीत, कीं फुटायला नाय शिकवीत. ह्यो लढा सुरूं करतांना मी तर म्होरं व्हतो, पन परमेसर आपनावर कोपलेला दिसतो आतां. आणि एकदां देव कोपला मग धडपड नाय करू मानसानी !

( जगदेव जाधव मोठ्यानें हसतो. लोक कुजबुजतात. )

देवावर आपुन इस्वास टाकला पायजे. आपुन कधीं कोणाची चोरी करूं न्ये कीं कोनाला शिवी देऊ न्ये. आपला परयत्न झाला की राह्यलेलं काम देवाचं. साधू संतांनीं ह्येच सांगितलं हाय [ जाधवाकडे रागानें पहात ] इकडं बघा जाधवराव, देव कोपल्यावर इनाकारन लोकास चिथावन्यांत काय मतलब नाय !

**यल्लप्पा** : या संघाशीं काय करावं मास्तर ?

**जावजी** : या संघाबिंघावरचा माझा इस्वास उडाला पार ! कुतऱ्याच्या मोलानं वागवत्यात ते आमाला ! भट्टीखात्यात आज ईस

वरसं काम करतोय मी, आनि भट्टीखात्यात पगार काय हवा ते हे संघवाले शिकवतायत जनू आमाला ! मह्यन्या मह्यन्याला वर्गणी घ्यायला तयार, आनि यांनीं केलंय काय आमच्यासाठीं ? ही ठकबाजी नाय तर काय ? मोठ्या गोष्टी सांगतो भट्टीखात्याच्या मानें ! [ कुज-बुज सुरू होते ]

**साखळकर** : शाबास जावजी मास्तर !

**जावजी** : ह्येंचा आमा लोकावर इस्वासच नाय. आमी कसा टाकनार यांच्यावर इस्वास ?

**यल्लाप्पा** : बराबर.

**जावजी** : संघ बिंघ राव्हं द्या. आतां आपलं काम आपनच बघून घेऊं !

( कुजबूज सुरू होते. )

**विठ्या लोहार** : त्येच तर चाललंय !

**जावजी** : इतके दिवस आपन इमानानं लढा चालवला आनि आतां आपली बायकापोरं उपाशी रडू लागली तर आपून हरलो असं कोन ह्मनल ? म्हनून सांगतो बाबानु, शेट लोकाशी तडजोड करायचा हुकुम द्या आमा पुढाऱ्यांना. आपन पडलो तर पडलो, पन या संघवाल्यांची अन् दुसऱ्या बाहेरच्या लोकांची लुडबुड नको मधी मधी. हरलो तर आपुन; जिंकलो तर आपुन. हे संघ बिंघ नाय पायजे मधी ! निकल जाव संघवाले !

[ लोक हसतात. ]

**यल्लप्पा** : बराबर, निकल जाव संघवाले !

( राजा पवार आणि बरेचसे कामगार 'नाही पाह्यजे संघवाले' ह्मणून ओरडतात. )

**साखळकर** : दगलबाज, हरामखोर !

[ साटम आणि विठ्या लोहार साखळकराला मार देऊं म्हणून धमकावतात. ]

**लखू** : ह्मातारचळ लागलाय जावजीला ! ह्मने संघवाले नको ! ह्या ह्मातारड्याला काय अक्कल हाये संघवाल्यापेक्षां ?

**साटम** : हे भट्टीखात्यांतले लोक एकापेक्षां एक हरामखोर आहेत !

**सावळे** : तरी मी पहिल्यापासून सांगतोय !

**जावजी** : माझं ह्मननं एवढंच कीं देवाला भिवून आतां वागावं.

**यल्लप्पा** : आनि ह्मनूनच चाललेला लढा सोडू न्हाई अर्ध्यावरच ! देव ह्येच सांगतो बरं का मास्तर !

**जावजी** : [ तिरस्कारानें पहात ] मला हायत् कान देव काय ह्मणतो ते ऐकायला !

**एक वात्रट पोऱ्या** : लई लांब हायत् कान !

[ लोक हंसतात. ]

**जावजी** : [ त्या पोऱ्याकडे पहात. ] अशी देवाधर्माची मस्करी करून चांगलं नाय होयाचं. देवाला भिवून काम नाय करायचं, तर आपुन काय तुमच्या बरोबर राहू नाय शकत.

( जावजी मास्तर खालीं उतरतात. यल्लप्पा वर चढायला जातो. 'ओढा त्याला खालीं' ह्मणून लोक ओरडतात. )

# १

## डिक्टेटर—

[ पडदा वर जातो तेव्हां रंगभूमीवर गडद अंधार असतो. उजेड झाल्यावर जी खोली आपणाला दिसणार आहे तिच्या खालच्या बाजूने कुठून तरी पितां पितां गात असलेल्या दहा-बारा माणसांचा आवाज येतो आहे. भिन्न आवाज आणि एकाच्या सुराला दुसऱ्याचा मेळ नाहीं, त्यामुळें गाण्याचें कांहीं तरी बेसुर गोंगाटांत रूपांतर झालें आहे. गाणारे वाटेल तिथे थांबत आहेत, आणि हातांतल्या ग्लासांनी टेबलावर तालाचा ठेका धरूं पहात आहेत. आरडाओरड, अपशब्द आणि हास्यांचे कल्लोळ यांचाही तालासाठीं कांहीं उपयोग होत असल्यास ते पहात आहेत!

रंगभूमी हळूहळू प्रकाशित होऊं लागते, आणि त्या प्रकाशांत तुरुंगांतील कोठडीचा अंतर्भाग दृग्गोचर होऊं लागतो. मागल्या बाजूला जुनाट दगडी भिंत दिसत आहे. मजबूत दगडी बुरुजांनीं भिंत निरनिराळ्या ठिकाणी विभागलेली दिसते. कोठडीच्या एका बाजूला एक अवजड लाकडी दरवाजा आहे. दरवाजाच्या समोरच्या भिंतींत वरच्या बाजूला उभे गज लावलेली एक खिडकी आहे. खिडकींतून येणारा उजेड कोठडींत पडला आहे. डाव्या बाजूला एक लाकडी खाटलें पडले आहे. त्यावर एक गवताची गादी आणि कांहीं फाटकी तुटकीं पांघरुणें पडलीं

आहेत. खाटेच्या जवळच एक तीन पायांचे स्टूल आहे. त्यावर एक गंजलेली टिनप्लेट, एक टिनपॉट आणि लोखंडी काड्यांचा एक चष्मा आहे. चष्म्याची एक कांच फुटली आहे. त्या खोलीचा आणखी एक अलंकार म्हणजे पाण्याचा जुनाट खुजा !

प्रकाश जसजसा वाढत जातो तसतशी त्या खाटेवर पडलेल्या एका माणसाची आकृति आपणाला अधिकाधिक स्पष्ट दिसू लागते. त्याच्या अंगांत कोट नाही; एक फाटका शर्ट आहे. तुमानीच्या चिंध्या लोंबत आहेत, आणि पायांतले बूट फाटून गेलेले आहेत.

त्याचे शरीर निःप्राण झालेले दिसते. टेबलाशी बसून सदोदित काम करणाऱ्या विद्वानांच्या पाठीला जसा एक प्रकारचा बांक येतो तसा बांक तो उभा राहिला म्हणजे त्याच्या पाठीला आलेला दिसतो. त्याचे पुढले दांत बहुतेक अर्धे मोडके दिसतात. बाकीचे जागेवरच नाहींत ! त्याचा चेहरा मलीन दिसतो; आणि त्यावर दोन दिवसाची दाढी वाढली आहे. पण इतके सर्व असूनहि त्या चेहऱ्याकडे पुन्हां पुन्हां आपली नजर वळते. तें तुळतुळीत टक्कल असलेले भव्य कपाळ, ते रेखीव, थरथरणारे ओठ आणि ते खोल, भेदक डोळे यांच्याकडे पुन्हां पुन्हां पहाण्याचा मोह आपल्या डोळ्यांना आवरतच नाहीं. या क्षणाला कमालीच्या श्रमानंतर गळून गेल्यासारखा तो पडला आहे. त्याचे हात त्याच्या छातीवर निर्जीवपणें पडले आहेत. त्याचे डोळे बंद आहेत. तो झोंपला आहे.

कांहीं तरी फुटल्याचा मोठा आवाज होतो, आणि पिणाऱ्यांचे गाणे थांबते. आपल्या कानांवर आवाज येऊं लागतात. ]

**पहिला** : ए, ती माझी बीर आहे !

**दुसरा** : चल हट्, ती माझी आहे !

**पहिला** : अरे जा रे, मी स्वतः औगुस्टला पाठवून ती आणवली. म्हणे माझी आहे !

**दुसरा** : ए हलकट, खोटं बोलतोस ?

**पहिला** : कोण हलकट ? कोण खोटं बोलतो ?

**दुसरा :** पाजी कुत्ता !

**पहिला :** कोण कुत्ता ?

**दुसरा :** तूं, तूं ! लूत लागलेला कुत्ता !

**पहिला :** असं काय ? थांब आलो. तुझी जीभ उपटून तुझ्याच घशांत कोंबतों !

**दुसरा :** ये ना. माझे हात कांहीं केळीं खायला नाहीं गेलेत !

**तिसरा :** ए पोरांनो, बाजूला व्हा पाहूं. डिक्टेटरांनीं काय सांगितलं तें विसरलांत वाटतं ?—आपण एकमेकांशीं आपापसांत मारामाऱ्या करण्यांत वेळ फुकट दवडतां कामा नये. अंगांत खुमखुमी आलीच असेल तर राज्याच्या शत्रुविरुद्ध वापरण्याकरतां ती राखून ठेवा !

**चौथा :** अगदीं बरोबर. डिक्टेटरसाहेब हेंच म्हणाले.

**पांचवा :** आणि ते म्हणाले तेंच बरोबर.

**पहिला :** पण—पण तो मला हलकट म्हणाला.

**तिसरा :** म्हणाला असेल, पण त्याच्या मनांत तसं नव्हतं कांहीं. काय रे, होतं का ?

**दुसरा :** त्यानं माझी बीर घेतली.

**पहिला :** मी मुळींच घेतली नाहीं. ए,—

**तिसरा :** अरे, मित्रांमित्रांत एका ग्लासाकरतां काय झगडतां ? हा पहा औगुस्ट आणखी बीर घेऊन आला.

**चौथा :** हं घ्या. तुम्हा दोघांना ही पुरून उरेल इतकी आहे.

**तिसरा :** औगुस्ट, त्यांना एकेकाला दोन दोन ग्लास वरपर्यंत भरून दे. आणि तितक्यानेंही त्यांची तहान भागली नाहीं, तर बीरच्या

पिंपांत नेऊन त्यांना बुडव. तें सुकं ठणठणीत होईपर्यंत पिऊं द्या त्यांना बीर !—ए, पोरांनों, आतां हातांतं हात घाला, आणि भांडण विसरून जा बघूं ?

**पहिला** : मी नाहीं त्याच्या हातांत हात देणार. तो मला—

**तिसरा** : दिलाच पाहिजे तुला—झालं गेलं विसरायला तो तयार आहे.

**पहिला** : तो आपले शब्द परत घेईल ?

**तिसरा** : खात्रीनें घेईल.—काय रे, घेतोस ना ! हं आतां ?

**पहिला** : बरं आहे. पण त्यानं आपला हात पहिल्यांदा पुढें—

[ पुनः त्यांचें ते बेसूर, कर्णकर्कश गाणे दुमदुमू लागतो ]

**माल्झिअस्** : (डोळे उघडतात, आणि अर्धवट झोंपेत डोकें दुसऱ्या बाजूला फिरवतात. गाणें अर्ध्यावरच एकदम थांबते. झोंपेतच, पण अगदीं जिव्हाळ्यानें आणि एक प्रकारच्या असामान्य रुबाबांत माल्झिअस् बोलू लागतात. ते बोलत असलेले शब्द त्यानीं अनेक वेळां पूर्वीं उच्चारले आहेत हें उघड दिसतें. ) सभ्य गृहस्थ हो, खरंच मला पुन्हां मारूं नका. या देहाला नाहीं सहन होणार तुमचं तें पुन्हां पुन्हां बडवणं—नाहीं हो, त्याला सहन करतां येणार. किती वर्षं झालीं आहेत त्याला.—अहो या देहाला बासष्ट वर्षं झालीं आतां. त्यांतलं रक्त आतां पहिल्यासारखं वेगांत वहात नाहीं,—पहा नाडीचे ठोके किती क्षीण झाले आहेत. ऐकलत ? सभ्य गृहस्थ हो, तुम्हीं सांगाल तें करायला मी तयार आहे. मी—मी म्हणजे कोण ? प्रोफेसर ग्रेगॉर माल्झिअस्.—बहुतेक तुम्हीं हें नांव ऐकलं असेल—

( ते एकदम मध्येंच थांबतात. आपण एकटेच आहोंत, आणि झोंपेत बरळतों आहोंत हें त्यांच्या ध्यानांत येते. ते डोळे मिचकावतात, स्वतःशीच हंसतात, आणि तोंडांतल्या तोंडांत पुटपुटतात. ) अरे देवा,— माफ करा हं !

[ अंग झटकून ते पुन्हां खाटेवर व्यवस्थितपणे पडतात, आणि डोळे बंद करतात. पुन्हां त्याना डुलकी येते. दुसऱ्या एका गाण्याचे पहिल्यासारखेच बेसूर, कर्कश स्वर ऐकू येऊं लागतात. रंगभूमीवरचा प्रकाश अंधुक होत जातो.

गाण्याची एक ओळ संपते, आणि गाणें एकदम थाबतें. कांहीं क्षण स्तब्धतेत जातात. गाण्याची दुसरी ओळ कानांवर येते. पण या वेळीं गाणारे आवाज पहिले नाहींत. अतिशय मृदु, मधुर आवाजांत तो गायली जात आहे. त्या आवाजांत कांहीं स्त्रियांचे आहेत हे ओळखतां येतें.

पुन्हां गाणें थांबते. पुन्हां पहिल्या बेसूर, कर्कश आवाजांत एक ओळ म्हटली जाते.

बरेच क्षण स्तब्धतेंत जातात. नंतर मागून येणाऱ्या त्या दुसऱ्या मृदुमधुर आवाजांत गाणें सुरू होतें. आणि एक प्रकारच्या आर्त वातावरणांत तें सबंध गाणें शेवटपर्यंत अत्यंत सुरेलपणें गाइले जाते.

मागे दिसणारी दगडी भिंत इतक्या वेळांत पारदर्शक झाली आहे; आणि तिच्यातून त्या तुरुंगाच्या कोठडीपेक्षां थोडी लहान अशी एक खोली माल्झिअसच्या खाटेच्याही वर आलेली दिसते आहे. त्या खोलीच्या डाव्या बाजूच्या कोपऱ्यांत एक दरवाजा आहे. खोलीच्या मध्यभागीं एका टेबलाभोंवती पदवीधर झाल्यानंतर उच्च अभ्यासक्रम घेतलेले आणि प्रयोगशाळेंत संशोधनकार्य करणारे बावीशी तेवीशीच्या आसपास असलेले, बरेचसे तरुण स्त्रीपुरुष विद्यार्थी बसले आहेत. टेबलावर त्यांच्या पुढ्यांत बीरची ग्लासें आहेत. त्यांच्यापैकीं अगदींच तरुण आहेत ते गात आहेत. जरा मोठे असलेले हळू, खालच्या आवाजांत कांहींतरी बोलत आहेत. गाणें संपतें. ]

**बोनार्ड** : ( चाळिशीच्या जवळ आलेला नमुनेदार फ्रेंच गृहस्थ ) : फ्लेमिंग म्हणतो—

**एलरमन्** : ( तिशींत असलेला ) : तो निराळं आणखी काय सांगतो !

**बोनार्ड्** : व्हर्चौप्रमाणेंच त्याचंहि मत आहे, कीं जें बीजांत तेंच वृक्षांत; लहानशा मांसपेशींत तेंच पुरेपूर वाढलेल्या देहांत. जे आहे त्यांत नवीन असं कांहीं नाहीं. कांहीं तरी पूर्वी होतं त्यांतून हें नवीन दिसणारं आलं ! मांसपेशींची ही अशी अखंड परंपरा—

**एलरमन्** : बाबा रे, आपण इथं इतरांचे सिद्धांत ऐकायला आलो नाहीं,—माल्झिअस् काय म्हणतात तें ऐकायला आपण इथं आलों आहोंत.

**मॅक्स** : माल्झिअस् ! आमचे माल्झिअस् म्हणजे—

**एल्स** : माल्झिअस्नां उदंड आयुष्य लाभो !

**विसॉट्स्की** : आपण त्यानां महाऋक्ष—बडा आस्वल म्हणत होतों नाहीं ?—म्हणत होतों कां ?—अजूनही म्हणतो म्हणा !

**एलरमन्** : हा बोनार्ड् पॅरिसमधल्या सॉर्बो युनिव्हर्सिटींतला; मी—

**ॲन्टन्** ( त्याला अडवून ) : हो—हो—माहीत आहे तूं किती दुरून आला आहेस तो ! एका तपकिरी डोळ्याच्या पोरीसाठीं तूं तीनशें अठरा मैल धांवाधांव केली होतीस तेंहीं आम्हाला माहीत आहे !

**एलरमन्** ( मुळींच न डगमगतां ) : हो, काय झालं ? ही एल्सा पहा—ती तर सातशें अठरा मैल—

**एल्सा** : आपले ग्रेगॉपुलॉस किती दुरून आलेत कल्पना आहे ?—अथेन्स—ग्रीस !

**ग्रेगॉपुलॉस** : फार वर्षं झालीं त्या गोष्टीला. आतां मी इथचाच नागरिक झालोंय्.

**मॅक्स** : काय असेल तें असो, जगांतले निवडक बुद्धिमान् तरुण माल्झिअस्ला शिकवायला मिळतात.

**एल्सा** : तरुणच का,—तरुणीसुद्धां !

**विसॉट्स्की** : हो इथंच पहा कीं. मी,—तुम्ही—आपण सर्वच.

**मॅक्स** : माल्झिअस् स्वतःच नेहमी असं म्हणतात.

**अँटन्** : माल्झिअस्—आस्वल !

**विसॉट्स्की** : छे छे; मांसपेशा माल्झिअस् !

**बोनार्ड्** : मांसपेशा खरा ! कांहींही होवो, त्यांचा मांसपेशीचा सिद्धान्त पुढें आलाच ! मला वाटतं आकाशांतल्या ताऱ्यांची हालचाल-सुद्धां आपल्या मांसपेशीच्या सिद्धान्तानें माल्झिअस् सिद्ध करतील !

**अँटन्** : सोपा आहे आपला हा सिद्धांत ! कांहीं मांसपेशी शरी-रांतल्या इतर नैसर्गिक क्रियाविरुद्ध बंड पुकारतात, आणि स्वतःची एक लढाऊ संघटना करतात. आतां, इतरांप्रमाणें त्यांचंहि कांहींतरी झालंच पाहिजे कीं नाहीं? त्यांचं जें व्हायचं तें होतं; आपण त्याला कॅन्सर म्हणतो !

**एलरमन्** : पुरे पुरे....ग्रेगॉपुलॉस, तूं आणखी हा सिद्धांत—

**ग्रेगॉपुलॉस** : नाहीं, नाहीं—बोलणारच मी. मी जो नवा निबंध लिहितो आहे, त्यांत हेंच सिद्ध करून दाखवणार आहे,—ही जी नवीन राज्यसत्ता उदयाला आली आहे, तीही एकप्रकारचा कॅन्सरच आहे; राष्ट्रदेहांत जे जे कांहीं म्हणून निरोगी आहे तें तें हा कॅन्सर कुरतडून टाकतो आहे.

**विसॉट्स्की** : म्हणूनच मी म्हणतो, कीं सर्वनाश होण्यापूर्वींच तो जागच्या जागीं काटून टाकला पाहिजे !

**ग्रेगॉपुलॉस** : आपणाला काय धोका आहे हें लोकांना एकदां कळू द्या.

**एल्सा** : सांगायचं तात्पर्य काय, कीं मांसपेशीच्या सिद्धांतापासून आपण हा धडा शिकलों !

**ग्रेगॉपुलॉस** : आणि आतां फार वेळ थांबतां कामा नये. आज सकाळचीच गोष्ट सांगतो. माथेफिरूंचं एक टोळकं आलं, आणि प्रोफेसर ब्रेमाँ—

**बोनार्ड्** : काय म्हणतोस; खरंच ?—

**ग्रेगॉपुलॉस** : तूं नव्हतास तिथं, बोनार्ड्. पण आम्हीं सर्व होतो—आम्ही पाह्यलं. ब्रेमाँच्या वर्गात ते शिरले. ब्रेमाँ, रक्ताचे निरनिराळे नमुने असलेल्या कांचा विद्यार्थ्यांना दाखवीत होते. त्यांच्या हातांतल्या कांचा घेऊन त्या टोळक्यानें त्या फोडून टाकल्या. त्यांनीं नवीन तयार केलेल्या कांचांवर ते थुंकले ! आणि वर्गातल्या फळ्यावर ' राष्ट्र चिरायु होवो !' हे शब्द त्यांनीं खरडले. शेवटीं आरडाओरड करून ब्रेमाँनां त्यांनी वर्गाबाहेर घालवून दिलें.

**अँटन्** : तें असेल, पण माल्झिअस्पुढें असला फाजीलपणा करायला त्यानां धैर्य होणार नाहीं.

**मॅक्स** : काय सांगावं, बाबा

**एल्सा** : पण ते असें करतात कां ?—कांहीं समजत नाहीं. शास्त्र तें शास्त्र. सत्य तें सत्य. असं करून काय होणार !

**विसॉट्स्की** : तें खरं. पण—आपल्या राष्ट्राच्या मानगुटीवर बसलेल्या क्रूरकर्म्याला सत्य हें सत्य वाटत नाहींना !

**एलरमन्** : शः, विसॉट्स्की !

**ग्रेगॉपुलॉस** : बोलूं दे, कां बोलू नये त्यानं ? बोलणं,—सत्य तें स्पष्ट बोलणं हेंच आजकालचं महत्वाचं कार्य आहे. एल्सा म्हणते तेंच खरं. शास्त्र हें शास्त्र आहे. साध्या डोळ्यांना कधीं दिसूही शकणार नाहीं अशी जीवसृष्टी मी जेव्हां सूक्ष्मदर्शक यंत्राच्या कांचेतून पहातों, तेव्हां मला सत्य दिसतं. पण मी जेव्हां या आपल्या आजूबाजूच्या जगांत पहातों,—एके काळीं जी आपली होती, आणि आतां जी त्यांची झाली आहे त्या या आपल्या प्रिय भूमिकडे पहातों, तेव्हां असत्य—असत्य,—सर्वत्र खोटेपणा पसरलेला मला दिसतो.

**बोनार्डू** : अरे, तुला काय करायचंय् ? दुसऱ्या कुठल्याही सरकारइतकंच आपलं सरकार चांगलं आहे.

**एलरमन्** : ग्रेगॉपुलॉस, तुझं कुठल्याच सरकारशीं भांडण नाहीं. कुठलंही निशाण फडफडावीनात ते. तुझं काय ? ताठ,—'हुश्शार' पवित्र्यांत उभं राह्यचं.—सलाम ठोकायचा. 'हायल्' 'हायल्' म्हणायचं, आणि 'आमचं राज्य चिरायु होवो' म्हणून ओरडायचं !

**एल्सा** : हो, पण सत्याला सत्य म्हणायला लोक तयार आहेत तोपर्यंत !

**ॲन्टन्** : माल्झिअस्च्या अंगाला हात लावायला ते धजणार नाहींत, नाहीं ?

**ग्रेगॉपुलॉस** : नाहींच लावतां कामा त्यांनीं. शास्त्रज्ञाचा संबंध चिरंतन तत्वाशीं असतो. आज आहेत नी उद्यां नाहींत अशा राजकीय गोष्टींशीं—

**एलरमन्** ( अंगावर कांटा आल्यासारखा होऊन ) : आज आहेत नी उद्यां नाहींत !—ग्रेगॉपुलॉस, जीभ आवर. काय बोलतोस ?

**ग्रेगॉपुलॉस** : हो, आज आहेत, नी उद्यां नाहींत, मी म्हणालों; आणि पुन्हां म्हणणार. कित्येक शतकानंतर डिक्टेटरांचं नांवसुद्धां कुणाला आठवणार नाहीं. पण तेव्हां माल्झिअसूचं नांव प्रत्येकाच्या जिभेवर नाचत असलेलं दिसेल.

**एलरमन्** : अरे, अरे—

**ग्रेगॉपुलॉस** : अरे काय ?—मी तुला स्पष्टच विचारतो, आपल्या राष्ट्राचं नांव कुणी उजळ केलं ? या राष्ट्राचे हजारो सुपुत्र मेले असते पण ज्याच्या संशोधनामुळें आज ते जिवंत आहेत त्या माल्झिअसूनें,—कीं जे जिवंत असायला पाहिजे होते अशा हजारो लोकांचे ज्याच्यामुळे मुडदे पडले त्या डिक्टेटरानें ?

**एलरमन्** : (उठून आपली खुर्ची आपटतो.) ग्रेगॉपुलॉस, राजद्रोह—हा उघड उघड राजद्रोह आहे.

**एलसा** : राजद्रोह—ऊं : !

**विसॉट्स्की** : ( बेनार्ड्कडे वळून ) काल रात्रीं आमची एक सभा झाली—

**एलरमन्** : मला नाहीं कांहीं ऐकायचं त्या सभेसंबंधी !

**ग्रेगॉपुलॉस** : कां नाहीं ? सर्व कांहीं सांगा रे, त्याला !

**विसॉट्स्की** : बोनार्ड खेरीज आम्ही सर्व हजर होतों—मॅक्स,—ॲन्टन्,—ग्रेगॉपुलॉस,—एल्सा——

**एलरमन्** : ( तिच्याकडे वळून )—तूं सुद्धां तिथं होतीस ?

**एल्सा** : नवी राजसत्ता झाली म्हणून काय झालं ?——तिथंही आम्हांला स्वातंत्र्य पाहिजेच.

**ग्रेगॉपुलॉस** : स्वतंत्र जगाच्या गोष्टी करणं, हा निव्वळ भ्रमिष्ट-पणा आहे. या जगांत माणसं मुळींच स्वतंत्र नाहींत.

**ॲन्टन्** : रसायनशास्त्रांतल्या कोष्टकासारखं जग पाहिजे—तर्कशुद्ध, संदेहरहित !

**ग्रेगॉपुलॉस** : आपण करूं या त्याला तसं ! कॅन्सरचा झटपट निकाल लावलाच पाहिजे !

**एल्सा** : आमच्या पहिल्या अंकांत आम्ही एक लेख——

**एलरमन्** : बस, बस,—मला कांहीं ऐकायचं नाहीं. ( फुसफुसत बाहेर जातो, आणि दरवाजा धाड्दिशीं मागे ढकलून देतो. )

**ॲन्टन्** : ( एलरमन्कडे बोट करून ) याच्यावर विश्वास टाका-यला हरकत नाहीं ना ?

**एल्सा** : मुळींच नाहीं; अगदीं विश्वासू आहे.

**ॲन्टन्** : कुठें चहाडी करणार नाहीं ना ?

**एल्सा** : एलरमन् ?—कधींच नाहीं.

**विसॉट्स्की** : आपला अंक बाहेर आला कीं हा आमच्या नावांनं बोटं मोडील, पण वाचल्याशिवाय मात्र रहाणार नाहीं !

**बोनार्ड्र** : ( ग्रेगॉपुलॉसकडे वळून ) बोला, बोला,—या गोष्टी ऐकायला मला मोठी मजा वाटते.

**ग्रेगॉपुलॉस** : बोनार्ड्, तूं आमच्या बाजूचा आहेस ना ?

**बोनार्ड्र** : आतां तुम्ही बाजू घेच म्हणून आग्रह केलात, तर मी तुमच्या बाजूला येईन; पण मनापासून म्हणाल तर मला कुठचीच बाजू नको आहे. मला बघायला मोठी गंमत वाटते. तुमचे ते परवलीचे संकेतशब्द—नंतर उत्तर म्हणून शीळ घालून म्हणायची ती गाण्याची ओळ—सर्व कांहीं एखाद्या मजेदार खेळासारखं वाटतं आपल्याला.—

**एल्सा** : नुसता खेळ नाहीं हा,—खेळापेक्षां पुष्कळच आणखी कांहीं आहे !

**बोनार्ड्र** : गुप्त कटाचा हा खेळ म्हणजे नुसता खेळच नव्हे, तर एक पोरकट खेळ आहे. मूर्खपणा आहे,—नुसता मूर्खपणा ! नाना देशाहून तुम्ही इथं आला आहांत. फाटके तुटके कपडे घालतां. कसल्यातरी सवंग दुकानांत कांहींतरी खाता, मध्येंच कुठें प्रेमाच्या भानगडी करता—आणि आपलं मुख्य काम करण्याऐवजी हा राजकारणाचा पोरकट खेळ खेळतां ! माल्झिअस् काय म्हणतील तुम्हांला ?

**एल्सा** : अरे बाबा, माल्झिअस् सुद्धां काल रात्रीं आमच्या सभेला आले होते !

**बोनार्ड्र** : ( हतबुद्ध होऊन ) शक्यच नाहीं !

**विसॉट्रस्की** : त्यांच्या मनांत यायचं नव्हतं, पण—

**बोनार्ड्र** : ( संतापून ) तुम्ही त्यांना आग्रहच करतां कामा नये होता !

**एल्सा :** त्यांना विश्वासांत घ्यायला कांहींच हरकत नाहीं.

**बोनार्ड्** : पण त्याना तुमचा हा विश्वास नी गैरविश्वास हवा कशाला ?

**एल्सा :** पण आम्हांला इतर कांहीं शंका आल्या, कीं आम्हीं नाहीं का त्यांचा सल्ला घेत ?

**बोनॉर्ड्** : म्हणून तुम्ही त्यांना या भानगडींत ओढता ?–राजकारणाची कचरपट्टी चघळणारे तुम्ही लोक शुद्ध,–निर्भेळ,–लंबकर्ण गाढव आहांत !—ती कचरपट्टी घेऊन माल्झिअस्‌कडे कां गेलांत— झक् मारायला ? राजकारण !—राजकारण !—तुम्हाला जमेल–तें सुद्धां कदाचित् जमेल–पण माल्झिअस् ?–माल्झिअस् आणि राजकारण ?– शक्यच नाहीं !--माल्झिअस् म्हणजे ज्ञान ! माल्झिअस् म्हणजे विज्ञान– माल्झिअस् म्हणजे संशोधन–माल्झिअस्‌नां यापेक्षां दुसरं काय प्यार आहे ?–शास्त्रज्ञ कुठल्याही राजसत्तेखालीं असो, त्याला निर्धोकपणें आपलं काम करीत रहातां आलं पाहिजे–त्याला काय करायचं आहे कुणाच्या हातीं राजसत्ता आहे ते ?

**ग्रेगॉपुलॉस** : ऐकलंस का बोनार्ड् ? आम्ही वीस जण जमलों होतों–एक योजना पण आंखली आहे––

**ॲन्टन्** ( हलक्या आवाजांत ) : हो—योजना आंखली आहे–

**मॅक्स** : आम्हाला स्वातंत्र्य मिळालंच पाहिजे.

**एल्स :** जनतेला वेळींच धोक्याची सूचना दिली पाहिजे.

**ग्रेगॉपुलॉस** : आम्हाला पाहिजे ते आम्ही लिहूं आणि पाहिजे ते प्रसिद्ध करूं !

**बोनार्ड** : आणि माल्झिअस् तुमचं हें सर्व ऐकत होते ?

**ॲन्टन्** : ते आपले एका बाजूला स्वस्थ बसले होते, आणि मोठमोठ्यानें हंसत होते.

**बोनार्ड** : मलाहि त्यांच्यासारख्या या गोष्टी हंसण्यावारी नेता आल्या असत्या तर किती बरं झालं असतं !—पण तें शक्य नाहीं.—हा विस्तवाशीं खेळ आहे—तुमच्या आमच्यासारख्या पोरासोरांचं हें काम नाहीं, छे !....( तो जायला उठतो. ) उद्याच्या उद्यां आपण पॅरीस गांठणार.

**एल्सा** : आम्ही स्वतःला कम्युनिस्टही म्हणवीत नाहीं, आणि फॅसिस्टही म्हणवीत नाहीं; पण स्वातंत्र्य हें—

**ग्रेगॉपुलॉस** : बौद्धिक स्वातंत्र्य—

**विसॉट्स्की** : तो आमचा जन्मसिद्ध हक्कच आहे.

**एल्सा** : तो हक्क आम्हीं मिळवूंच !

**मॅक्स** : योजना तयार आहे—

**ॲन्टन्** : अतिशय गुप्तपणें आम्ही योजना आंखली—

( सर्वजण टेबलाभोंवती पुढें वांकून जवळ येतात, आणि कांहीं तरी कुजबुजू लागतात; बोनार्ड एका बाजूला उभा आहे. मागला दरवाजा खाडकन् उघडला जातो. दारांत गणवेष घातलेले लोक उभे दिसतात.)

**त्यांचा अधिकारी** : ( आंत प्रवेश करतो, आणि विशिष्ट पद्धतीनें हात वर करून ओरडतो. ) राज्य चिरायु होवो !

[ एकदम दिवे जातात आणि काळोख होतो. पुन्हां एकदम दिवे येतात; पण या वेळीं ते पुढल्या तुरुंगाच्या कोठडींत आले आहेत. कोठडीचा तो अवजड, लांकडी दरवाजा उघडा आहे. एक सैनिक आंत प्रवेश करतो. ]

**सैनिक** : ( त्याचं नांव ओटो आहे ) राज्याचा विजय असो !

**दुसरा सैनिक** : (आपलं पिणं संपवून पहिल्याच्या मागून प्रवेश करीत) राज्याचा विजय असो!

**ओटो** : झोपली आहे स्वारी !

**दुसरा सैनिक** : ( रोलफ् ) जातिवंत डुक्कर आहे !—डुक्कर ! माल्झिअस् !

**ओटो** : ( तिरस्कारांच्या स्वरांत ) प्रोफेस्सर ? अं !—प्रोफेस्सर माल्झिअस् !

**रोलफ्** : कुत्र्या मांजरांचे प्रोफेसर !

**ओटो** : लेकाला चष्म्याशिवाय स्वतःचा पायसुद्धां दिसत नाहीं !

**रोलफ्** : मी एकदां त्याला ठोसा मारून खालीं पाडला, तेव्हां फोडून टाकला त्याचा चष्मा ! तुला कल्पना नाहीं ओटो, अगदींच बायकी आहे लेकाचा. त्याच्या अंगांत कांहींच ताकद नाहीं.

**ओटो** : चष्मा फुटला ना ? आतां खूप पाहून घे म्हणावं !

**रोलफ्** : नशीब माझं मी सावधगिरीनं वागलों—मी नेहमीच सावध असतो म्हणा—नाहीं तर त्या फुटक्या कांचेवर माझा हातच कापला असता.

**ओटो** : चष्मा लावलेल्या माणसाला ठोसा मारून चालणार नाहीं.

**रोलफ्** : ( चकित होऊन ) म्हणजे त्याला कधींच मारायचा नाहीं ?

**ओटो** : तसं नव्हे रे—त्याला हातानं—ठोशाबुक्क्यांनीं मारायचा नाहीं. मारायचा तेव्हां दंडुक्यांनीं मारायचा.

**रोल्फ्** : ( निश्चयानें मान हालवीत ) आतां पुढच्या वेळेला,—त्याला मुळीं माझ्या बंदूकीच्या दस्त्यानंच ठेंचून काढतो.

**ओटो** : आपण त्याला जागा केला पाहिजे. सेनापतीसाहेब येताहेत. ( खालच्या आवाजात ) कदाचित् त्यांच्याबरोबर डिक्टेटरसाहेबहि येतील म्हणतात.

**रोल्फ्** : काय ?

**ओटो** : अरे, डिक्टेटरसाहेब—

**रोल्फ्** : या माल्झिअस्ला भेटायला डिक्टेटरसाहेब कधींच येणार नाहींत.

**ओटो** : अरे, पण त्याला ताबडतोब उठवायचा आपणाला हुकूम आहे.

**रोल्फ्** : तूं मागे हो, ओटो—उठवतों मी त्याला ( पुढें जाऊन मुद्दाम मोठमोठ्यानें खोकला काढून माल्झिअस्च्या तोंडावर थुंकतो. ) उठा, उठा,—अहो, कुत्र्यामांजरांचे प्रोफेसर !

**ओटो** : ( तोंडातल्या तोंडांत हंसत ) काय रे, हालत नाहीं बेटा !

**रोल्फ्** : आपण 'ठीक केला' आहे ना !—आपल्या 'ठीक करण्या'चे परिणाम तुला माहितच आहेत. 'ठीक केल्या' नंतर म्हणे झोप चांगली येते. निद्रानाशावर हा एक उत्तम उपाय आहे ! ( माल्झिअस्ला एक लाथ हाणतो. ) उठ रे ये—माल्झिअस् !

**माल्झिअस्** : ( एकदम जागा होतो; उठतो; आपण सलाम केला पाहिजे याची आठवण होऊन ) राज्याचा विजय असो !

**ओटो** : तुझं आमच्या राज्याविषयीचं प्रेम उतू जातं आहे, तें माहीत आहे !

**रोल्फ्** : हुश्शार ! ( माल्झिअस् सरळ, ताठ उभें रहाण्याचा प्रयत्न करतात. ) ए, डुक्कर ! ए, माल्झिअस्, मी डुक्कर म्हणून हाक मारली, कीं ' हजीर साहेब ' म्हणून तूं म्हटलं पाह्यजेस.—समजलास, ए डुक्कर !

**माल्झिअस्** : हजीर साहेब !

**रोल्फ्** : ( आनंदून ) पहा, किती लवकर शिकला !

**ओटो** : लवकर शिकतो म्हणून ठीक आहे; नाहीं तर आम्ही चांगलाच शिकवूं !

**रोल्फ्** : ए डुक्कर, त्या राजद्रोह्यांविषयीं काय काय माहिती आहे रे तुला ?

**माल्झिअस्** : कांहींच नाहीं.

**रोल्फ्** : कांहींच माहिती नाहीं म्हणतो.—आणि म्हणे आपण मोठे प्रोफेसर आहोंत !

**ओटो** : ( माल्झिअस्ला ) त्यांचा कशासंबंधी कट चालला होता?

**रोल्फ्** : त्यांच्याविषयीं सगळं कांहीं आम्हांला सांग. मग आम्ही तुला मुळींच मारणार नाहीं,—निदान फारसं तरी मारणार नाहीं.

**माल्झिअस्** : महाराज, मी कधीं काळीं कटवाला होईन असं तुम्हाला वाटतं तरी कसं? कसला कट माझ्या हातून होणार? माझं वय काय? माझं आतांपर्यंतचं आयुष्य कसं गेलं?—रक्तपेशींच्या सिद्धान्तापलीकडे मला कशाशीही कर्तव्य नाहीं.

**रोल्फ्** : ( मोठ्यांदा हंसून ) हें फार छान ! डोक्यावर दंडुका बसून रक्ताच्या धारा वाहायला लागल्या, तेव्हां आमच्या प्रोफेसर

डुक्करसाहेबांना खूपच रक्तपेशींचे सिद्धांत दिसले असतील—ह्यः! ह्यः! ह्यः! ह्यः!

**ओटो** : ( तोहि हंसतो आहे. ) रक्तपेशींचा सिद्धान्त अगदीं तंतातंत बरोबर आहे खरा!

**रोल्फ्** : त्याला आणखी पुष्कळ 'सिद्धान्त' मला दाखवायचे आहेत! ए, डुक्कर–ए, डुक्कर!–अरेच्या! 'हजीर साहेब' म्हणत नाहीं लेकाचा! पहा जरा गंमत करतो त्याची.

**ओटो** : बघतोच कीं!

**रोल्फ्** : हं, हा पहा–हा माझ्या कमरेचा नवा कोरा पट्टा आहे–पाह्यलास ?—आणि त्याला हें पहा केवढं मोठं मजबूत पितळेचं बकल् आहे.–आणि,–आणि आतां पुन्हां ठोसा मारून त्याच्या चष्म्याच्या काचेवर मी माझा हात कापून घेणार नाहीं.–तर, तर–काय करणार

**ओटो** : अरे, सेनापतीसाहेबांना येऊन जाऊं द्या; आतां नको. सेनापती आतां येतील—कदाचित्, डिक्टेटरसाहेबही त्यांच्याबरोबर येतील—आणि जर का तूं उगाच घाई केलीस तर गम्मत होईल खरी, पण ती याची नाहीं,–तुझी होईल. स्वतः सेनापतीसाहेबच तुझी चांगलीच 'गम्मत' करतील.—असली 'गम्मत' करण्यांत सेनापतीसाहेबांचा हातखंडा आहे.—आणि पुन्हां, त्यांना असल्या 'गम्मती'चे नाना प्रकार माहीत आहेत—

( पुढल्या तुरुंगाच्या कोठडींतले दिवे अंधुक होत होत विझून जातात. मागल्या बाजूचे दिवे प्रकाशूं लागतात. मागच्या बाजूला एका गॉथिक प्रार्थनामंदिराचा अंतर्भाग दृग्गोचर होतो. मंदिराच्या उंच घुमटाचा आंतला खोल भाग दिसतो आहे. आंतल्या भिंतींना पांढरा रंग दिलेला आहे. मंदिराचा उंचच उंच असा जो

अंतर्भाग दिसतो आहे तो वरचा भाग आहे. दिसत असलेल्या भागाच्या जवळ जवळ निम्मा उंच होईल इतका त्या खालचा भाग दृष्टिपथांत नाहीं. मंदिराची तक्तपोशी दृष्टिपथांत नसल्यामुळें तिच्यावर उभे असलेल्या लोकांची डोकींही आपणाला दिसणें शक्य नाहीं. समोर दिसत असलेल्या मधल्या भिंतीच्या किंचित् उजव्या बाजूला डिक्टेटराची एक भली मोठी तसबीर लावलेली दिसत आहे. तिच्या खालीं किंचित् डाव्या बाजूला एक व्यासपीठ असून व्यासपीठावर येण्याकरतां असलेला लहानसा दरवाजा त्याला लागूनच आहे. दोरी ओढण्याची एक भली मोठी चाकी वर छपरात अडकवलेली आहे; आणि तिच्यातून एक अवजड दोरखंड लोंबतो आहे. दोर ताठ झालेला दिसतो आहे. त्याच्या खालच्या टोकाला कुणा-तरी माणसाचीं करकचून बांधून टाकलेलीं मनगटे आणि उघडे दंड दिसत आहेत. व्यासपीठाच्या दोन्ही बाजूंना मेणबत्त्या पेटत आहेत, आणि अगदी खालीं कुठे तरी अंधुक दिवे लावले आहेत. या खालच्या दिव्यामुळें खालून वर जाणाऱ्या अशा लांबच लांब वेड्या वांकड्या सावल्या भिंतींवर, डिक्टेटेराच्या त्या तसबिरीवर आणि वर घुमटाच्या आंतल्या वाटोळया खोल छतावर पडल्या आहेत. त्रिकोणी आकाराचे भले मोठें लोखंडी वजन ज्याच्या पायाला बांधलें आहे, अशा दोरीवरून लोंबणाऱ्या एका माणसाच्या शरीराची सावली आपणाला भिंतीवर दिसते; त्याशिवाय खालीं फिरणाऱ्या निरनिराळया माणसांच्या, आणि इकडून तिकडे हालवल्या जाणाऱ्या वस्तूंच्या चित्रविचित्र सावल्या दिसतात. निश्चल बसलेले दोन पुरुष आणि एक स्त्री यांच्या सावल्याही एका भिंतीवर दिसत आहेत. बाकी सर्वत्र काळोख आहे. स्तब्धतेंच बराच वेळ जातो. नंतर—)

**एक आवाज** : हुश्शार !

( व्यासपीठामागला दरवाजा उघडतो, आणि त्यांतून चांगल्याच माजलेल्या बोक्यासारखे दिसणारे सेनापतिसाहेब प्रवेश करतात. )

**कित्येक आवाज** : राज्याचा विजय असो !

( सलाम करणाऱ्या हातांच्या अनेक सावल्या क्षणांत भिंतीवर दिसतात आणि क्षणांत नाहींशा होतात. )

**सेनापती** : ( भरल्या डोळ्यांनीं डिक्टेटराच्या तसबिरीकडे वळून ) राज्याचा विजय असो ! ( व्यासपीठावर बैठक मारतो. व्यासपीठ

भरगच्च भरून बाहेर आणखी त्याच्या शरीराचा थोडाबहूत भाग उरतोच !) कसं काय, सभ्य स्त्रीपुरुषहो !—चुकलो–एकच स्त्री आहे, नाहीं का ?—सभ्य स्त्री, आणि पुरुष हो ! चार महिन्यापूर्वी आपली भेट झाली तेव्हां आपण बरेच जण होतां–आतां तितके उरला नाहींत–तरीपण तुम्हांला पुन्हां भेटण्यांत मला मनःपूर्वक आनंद वाटतो. ( खिशांतून एक सिगार बाहेर काढतो, तिचं टोंक दांतांनी तोडतो आणि व्यासपीठाखालीं डोकें वांकवून, खालीं उभे असलेल्या पण रंग-भूमीवर न दिसणाऱ्या कैद्यांच्या अंगावर तें थूंकून टाकतो. ) तुम्हाला मार्गावर आणण्याकरतां गेले कित्येक आठवडे जी उपाययोजना चालली होती ती चालवण्याचं सुखदायक काम इतके दिवस माझ्या हाता-खालच्या दुय्यम अधिकाऱ्याकडे होतं.—आज मी स्वतः—खुद्द सेनापतीसाहेब–तें काम हातीं घेत असलेले पाहून तुम्हाला खूपच आश्चर्य वाटत असेल यांत शंका नाहीं; पण—( व्यासपीठाजवळच्या मेणबत्तीवर सिगार पेटवतो; अगदीं खुशीनें मिटक्या मारीत सिगारचे झुरके घेतो )—पण, मला वाटतं आतांपर्यंत तुम्हा लोकांवर घालवला हाच वेळ वाजवीपेक्षां फाजील झाला. ( आपला एकभिंगी चष्मा एका डोळ्याला लावतो; आणि वांकून खालीं पहातो. ) आपले मित्र एलरमन् आज इथं दिसत नाहींत त्याचं मला वाईट वाटतं–मोठा होतकरू तरुण होता–तुम्हां लोकांच्या एकाही सभेला आपण हजर नव्हतो म्हणून पुन्हां पुन्हां जीव तोडून सांगत होता.

**एलसाचा आवाज** : तो खरोखरच एकाहि सभेला हजर नव्हता.

**सेनापती** : खरंच ? आपण एकाही सभेला हजर नव्हतों,—आणि तुम्ही सर्व लोक निरपराधी आहांत, ही गोष्ट तो इतके वेळां

पुन्हां पुन्हां ठांसून सांगत होता, कीं आम्हाला त्याच्यावर किंचित जादा उपाययोजना करावी लागली. हृदयक्रिया बंद पडून त्याला एकाएकी इहलोकाचा निरोप घ्यावा लागला, ही घटना मात्र फारच दुर्दैवी झाली यांत शंका नाहीं.

**एल्सा** : हृदयक्रिया बंद पडली ?—त्याला गोळी घालण्यांत आली !

**सेनापती** : बाईसाहेब, उगाच अतिशयोक्ति कां करतां ?—हृदयक्रियाच बंद पडली—आणि आपला तो छोटा दोस्त विसॉट्स्की—मोठा गमत्या गडी—त्याचीहि हृदयक्रियाच बंद पडली. आमचे लोक त्याला जेव्हां दांडक्यानीं बडवीत असत तेव्हां कसा एकाद्या तंगडी मोडलेल्या पक्ष्यासारखा एका पायावर तो लंगडत लंगडत उड्या मारायचा !—मोठा गमत्या गडी !—मजा वाटायची त्याचा तो लंगडीचा खेळ पहायला !—आणि ती काळ्या भोर केंसांची सुरेख छोकरी—विसरलों—काय बरं नांव तिचं ? जाऊं द्या—दुसरा तो लंगडणारा लांबटांग्या—छे:, नाही आठवत—आणि हो, तो ग्रीक नांव असलेला गृहस्थ कोण बरं तो—

**एल्सा** : ग्रेगॉपुलॉस.

**सेनापती** : हं. हं. ग्रेगॉपुलॉस—फार मोठा लेखक—' स्वातंत्र्य,—मानवाचा जन्मसिद्ध हक्क ' या विषयावरला त्याचा निबंध दुर्दैवाने अजून प्रकाशांत आला नाहीं, नी येईलसा दिसत नाहीं—पण मोठा मार्मिक नी विद्वत्ताप्रचुर निबंध आहे, नाहीं ? काय झालं कुणाला ठाऊक; पण हृदयक्रिया बंद पडून म्हणा किंवा दुसऱ्या कांहीं कारणानं म्हणा ग्रेगॉपुलॉससाहेब आतां चिरंतन तत्वांत अगदीं कायमचे विलीन

झाले आहेत. विलीन झाले म्हणजे काय—अगदीं ' माती असशी, मातित मिळशी '—अगदीं मातीत मिळून गेले !—आणखीही पुष्कळांचीं नांवं सांगतां येतील; पण बरीचशीं मी विसरूनही गेलों आहे—पण पहातो एकदां प्रयत्न करून आठवायचा, हं.—सुरवातीला तुम्ही सर्व मिळून एकंदर चोव्वीस जण होता, नाहीं ? पैकीं माल्झिअस् अजून जिवंत आहे.—दुसऱ्या ठिकाणीं त्याला ठेवलाय्, पण अगदीं सुरक्षित आणि सुखरूप आहे तो. बोनार्डूनें पॅरीस गांठलें—लेकाचा जातिवंत फ्रेंच खरा ! फ्रेंच वकीलातींत तो दररोज न चुकता जायचा असं दिसतं—कारण तो नाहींसा झाल्याबरोबर तावडतोब दुसऱ्या दिवशीं फ्रेंच वकिलातीतून विचारणा आली. त्याला आम्ही चांगला पिटून काढला, नी सोडून दिला. हें दरबारी गुपित आहे—पण तुम्हाला सांगायला हर-कत नाहीं; कारण तुम्हीं आतां तें कुणालाच कळवूं शकणार नाहीं—तुमचा खटला आजच कायमचा निकालांत निघणार.—हो, काय बरं म्हणत होतों मी ?—हं, तुमच्यापैकीं आतां फक्त चार जण उरले आहेत. आणखी माल्झिअस्,—आणि बोनार्ड् सहावा—आणि सुरुवातीला तुम्हीं होतां चोव्वीस जण, हो ना ? आतां बरोबर हिशोब करून इतरांचं काय झालं तें ठरवायचं, म्हणजे—म्हणजे मोठंच गणित केलं पाहिजे.—आपल्याला ते नाहीं जमायचं, बुवा. गणितांत मी पहिल्या-पासूनच कच्चा आहे. ( थोडा वेळ थांबतो. नंतर, कठोर आवाजांत ) तुम्ही—तुम्ही मूठभर लोकांनीं राज्य उलथून पाडण्याचा कट केलात ! पांच कोट लोकांविरुद्ध तुम्ही पंचवीस देशद्रोह्यांनीं बंड पुकारलंत ! तुम्हांला कितीही भयंकर शिक्षा दिली तरी ती कमीच ठरेल; आणि ती तुम्हाला दिली जाईल हें निश्चित समजा—तुमच्याशीं वागतांना

पहिल्यापहिल्यांदा आम्ही खूपच सहनशीलता दाखवली. तुमची स्मरणशक्ति धड नव्हती. त्यावर आस्तेआस्ते उपाययोजना करून आम्ही तिला उजळण्याचा प्रयत्न केला. साध्यासुध्या उपायांनी जमेना तेव्हांच अधिकाधिक कडक उपायांची योजना आम्ही करूं लागलों. पण तुमच्या स्मृतिमंजूषेतून कांहींच बाहेर पडेना!—तुम्ही नुसतीं नाटकी भाषणं आम्हांला ऐकवूं लागला; पण नाटकी भाषणांची भानगड अशी आहे, कीं तीं ऐकायला रसिक श्रोतृवृन्द लागतो! रसिक श्रोते नसतील तर तीं भाषणं म्हणजे फुसकें बार होतात. कांहीं केल्या तुमचा हट्ट कांहीं सुटेना. झालं तेवढं खूप झालं. आतां माझ्या सहनशीलतेचा अंत झाला आहे. आज दुपारी खुद्द डिक्टेटरसाहेबांची स्वारी इथं येणार आहे. तुमच्या श्वासोच्छ्वासांनीं दूषित झालेली हवा त्यांच्या नाकपुड्यांत जाऊन चालणार नाहीं.—तुमच्यापाशीं कांहीं विशेष महत्वाची माहिती आहे—नांवं आहेत—पत्ते आहेत. आम्हाला ही माहिती हवी आहे. शेवटचीं दहा मिनिटें तुम्हाला देण्यांत येत आहेत. तेवढ्या अवधींत इथले मुख्य अंमलदार तुमची उलटतपासणी करतील—अगदीं कसून उलटतपासणी करतील. एकदां कां दहावें मिनिट उलटून गेलें कीं कीं—( जागच्या जागीं छाती ताठ करतो आणि सिगारच्या टोंकावरील राख बोटानें टिचकीनें उडवून ) कीं, तुम्हीही गेलांत-अगदीं निजधामाला गेलात म्हणून समजा! सभ्य स्त्री आणि—हो—आणि सभ्य पुरुष हो, राज्याचा विजय असो!

**( तो उठून सलाम ठोकतो, आणि लष्करी शिस्तींत निघून जातो. अनेक लष्करी हुकूम सुटताहेत असा खालून आवाज येतो. आणि भिंतीवर अनेक सावल्या उलख्या सुलख्या हालतांना दिसतात. खण्, खण्, असे ध्वनि ठराविक**

अंतराने कांही वेळ ऐकूं येतात, आणि त्यादोरखंडावरून लोंबत असलेला तो अर्धनग्न स्थितींतला मानवी देह झटके खात वर जात असलेला दिसतो.

कुणा तरी स्त्रीची एक किंकाळी ऐकूं येते.

मागले दिवे हळूहळू अंधुक होत जातात. पुढले दिवे प्रकाशूं लागतात. पुढला, तुरुंगाच्या कोठडीचा देखावा आहे तसाच आहे. )

**ओटो** : ए, माल्झिअस् ! आणखीन् ताठ उभा रहा.

**माल्झिअस्** : नाहीं येत हो !

**रोल्फ्** : नाहीं येत ?

**माल्झिअस्** : ( बोटानें दाखवीत ) या गुढग्याचं हाड अजून नीट बसलेलं नाहीं.–आणि या पहा––या दोन बरगड्या पण मोडलेल्या आहेत.

**ओटो** : आणखीन् ताठ,–रहातोस कीं नाहीं ?

**रोल्फ्** : थांब. आणखीन् ताठ कसं उभं रहायचं तें दाखवतो मी तुला. ( त्यांच्या मागे जाऊन आपलें ढोपर त्यांच्या पाठींत जोरानें खुपसतो; आणि त्यांचे खांदे मागे ओढतो. )

**ओटो** : संभाळ, रोल्फ् ! ( माल्झिअसूला ) चष्मा लाव, म्हातारड्या ! सेनापतीसाहेब आतां इथं येतील.

**रोल्फ्** : काय रे, बघतोस काय ? चष्मा कां नाहीं लावीत ?

**माल्झिअस्** : चष्मा ?—कुठं आहे ?—मला नाहीं दिसत.

**ओटो** : ( चष्मा उचलून त्याच्या हातांत देतो ) हा घे !

**माल्झिअस्** : ( चष्मा डोळ्यावर चढवून ) डाव्या बाजूच्या भिंगाला तडा गेलाय् वाटतं.

**बाहेरला एक आवाज** : हुश्शार !

**ओटो** : हुश्शार !

( सेनापती आंत येतो. दोघे सैनिक आणि माल्झिअस् ' हुश्शार ' पवित्र्यांत उभे आहेत ते दोघे नेहमीचा सलाम ठोकतात. माल्झिअस् चष्म्याच्या भानगडीत गुंतले आहेत. त्यांचे लक्षच नाहीं. )

**सेनापती** : काय प्रोफेसरसाहेब, कसं काय ?

**माल्झिअस्** : ( सलाम ठोकून ) राज्याचा विजय असो !

**सेनापती** : राज्याचा विजय असो ! ( आपल्या एकभिंगी चष्म्यानें माल्झिअस्नां न्याहाळीत त्यांच्याभोंवती फिरतो. हातांत घोडेस्वाराचा चाबूक आहे, त्यानें माल्झिअस्च्या तुमानीवरील धूळ उडवीत ) रोल्फ्, जनावर तयार तर छान झालं आहे !

**बाहेरला आवाज** : हुश्शार !

**ओटो** : हुश्शार !

( सेनापती आणि इतर मंडळी ' हुश्शार ' पवित्र्यांत उभे रहातात. पूर्वीच्या देखाव्यांत भिंतीवर जी आपण तसबीर पाहिली तिचा नायक दारात उभा आहे. त्याचें शरीर किडकिडीत, लष्करी शिस्तींत वाढलेलें दिसतें. चेहेऱ्याची ठेवण किंचित् नेपोलियनसारखी आहे. चेहेऱ्याचा एकंदर वर्ण पांढरा फटीक असून नाक बांकदार, पुढें आलेले आहे. जिवणींत मार्दव मुळींच नाहीं. साऱ्या चेहेऱ्यांत डोळे मात्र उठून दिसतात.)

**सर्व आवाज** : राज्याचा विजय असो !

**डिक्टेटर** : ( एक प्रकारची यांत्रिक हालचाल करीत सलामीचा स्वीकार करतो. ) राज्याचा विजय असो ! ( खोलींत प्रवेश करतांनाही त्याची हालचाल थोडीशी ओढून ताणून आणलेली, यांत्रिक अशी वाटते. नेहमीच त्याची हालचाल अशी असते. त्याच्या मागून त्याच्या शरीररक्षक दलांतले अंमलदार आणि सैनिक येतात. त्यांच्यापैकीं एका

सैनिकाच्या हातांत एक घडीची खुर्ची आहे. ती तो डिक्टेटरासाठीं ताबडतोब खालीं ठेवतो. दुसरे दोघेजण एक मेज जवळ आणून ठेवतात. एक चामड्याची बॅग एक अंमलदार मेजावर ठेवतो. टांचणीनें एके ठिकाणीं टोचलेले दोन टाइप केलेले कागद एक अंमलदार मेजावर ठेवतो. दुसरा एक सैनिक टांक, पेन्सिली, एक पॅड वगैरे वस्तू आणून ठेवतो. तिसरा दूरच्या एका कोपऱ्यांतून एक मोठी थोरली दौत आणतो. हीं सर्व कामें इतक्या झटपटीनें आणि इतक्या शिस्तीनें करण्यांत येतात, कीं हा कार्यक्रम या लोकांच्या अंगवळणीं पडलेला, नेहमींचाच आहे हें उघड दिसते. डिक्टेटर खुर्चीवर बसतो. त्याचे शरीरसंरक्षक त्याच्यामागें ताठ उभे राहतात. डिक्टेटर टक लावून समोर पाहातो आहे. ) हा——हाच का माल्झिअस् ?

( एकंदर सर्व प्रकारामुळे माल्झिअस् इतके गांगरून गेले आहेत कीं ताबडतोब उत्तर देण्याचें त्यांना भानच रहात नाहीं. )

**सेनापती** : ( डिक्टेटरच्या बाजूला उभा राहात ) होय, सरकार.

**डिक्टेटर** : त्या माणसाला जरा माझ्याजवळ यायला सांगा....मी काय बोलतोय त्याला ऐकूं येतं का ?....कीं तो बहिरा आहे ?

**सेनापती** : नाहीं सरकार. थोडंसं वय झालंय त्याचं. बाकी कांहीं नाहीं. तशी त्याची प्रकृती छान आहे....हो की नाहीं, प्रोफेसर माल्झिअस् ?

**माल्झिअस्** : हो हो तर. माझी प्रकृती अगदीं छान आहे....मला इथं फारच चांगल्या रीतीनें वागवतात.

**डिक्टेटर** : जरा जवळ या पाहू.

**माल्झिअस्** : ( पुढें येतात. भेदरलेल्या, निर्जीव आवाजांत एखाद्या यांत्रिक बाहुलीप्रमाणें बोलत आहेत. ) मला इथं फारच उत्तम रीतीनें वागवण्यांत आलं आहे. सेनापतीसाहेबांनीं तर माझ्याबद्दल वेळोवेळीं फारच आस्था दाखविली आहे. पण—पण एक गोष्ट विसरतां कामा नये. मी—मी प्रोफेसर ग्रेगॉर माल्झिअस् जीव–रसायनशास्त्राचा प्रोफेसर आहे. गेली तीस वर्षें मी या विद्यापीठांत अव्याहत शिकवतों आहे. रॉयल सोसायटीचा मी फेलो आहे; त्याशिवाय बर्लिन, रोम, बॉस्टन्, पॅरीस, स्टॉकहोम येथील ॲकेडेमींचा मी सन्मान्य सभासद आहेच. नॉटिंगहॅम मेडल्, लामार्क मेडल्, पोर्तुगालची ऑर्डर ऑफ सिंजन् आणि प्रख्यात नॉबेल पारितोषक मला मिळालं आहे. मला वाटतं—मला वाटतं—माझ्या नाडीचे ठोके अलिकडे मंदावले आहेत; पण—पण मला किती तरी पदव्या आतांपर्यंत बहाल करण्यांत आल्या आहेत. आणि—आणि स्थलांतर करणाऱ्या रक्तपेशींसंबंधी मी जे संशोधन चालवलं आहे तें अजून संपलेलं नाहीं. मला इथं ज्या तऱ्हेनें वागवण्यांत येत आहे त्याबद्दल माझी मुळींच तक्रार नाहीं; पण—पण माझं संशोधन—माझे प्रयोग करण्याची परवानगी मला मिळालीच पाहिजे. ( एखाद्या घड्याळाची किल्ली संपून तें एकदम खट्कन् बंद व्हावें, तसें प्रो. माल्झिअस्चें बोलणें थांबतें. त्यांचं भाषण चालू असतां सेनापति त्यानां थांबवण्याचा प्रयत्न करण्याच्या बेतांत असतो; पण डिक्टेटर त्यालाच थांबवतो. )

**डिक्टेटर** : ( कठोर, निर्विकार आवाजांत ) खरं आहे तुमचं म्हणणं, प्रोफेसर माल्झिअस्. तुमच्या बाबतींत मोठी लाजिरवाणी चूक

करण्यांत आली आहे. ( तो मध्येच थांबतो. त्याचा चेहरा अधिकच कडक दिसूं लागतो. त्याचे डोळे समोर शून्यांत पहात आहेत. त्याच्या हातांना मधून मधून सूक्ष्म झटके येतांना दिसतात. ) काळ असा आला आहे, कीं या वेळेला राष्ट्रासाठीं प्रत्येक नागरिकानें आपल्या सर्वस्वाचा त्याग करायला तयार झालं पाहिजे. [ त्याचा आवाज खटके खात वर चढतो, आणि: खालीं उतरतो. त्याचें भाषण ऐकतांना विकृतप्रकृति माणसांची आठवण होते. ] हेवेखोर शत्रूंनीं भोंवती कोंडी केली असूनही आपली नवजीवनशाली पितृभूमि आपल्या उज्वल भवितव्याच्या वाटेवर एक एक पाऊल डौलानें टाकीत पुढेंच जाते आहे. अडचणींचे डोंगर तुडवून आम्ही पुढें जात आहोंत. आपण पुढें जात आहोंत, आपण जिंकत आहोत, कारण आपल्या हृदयांत अजिंक्य इच्छाशक्ती वास करते आहे. विद्या आणि शास्त्रांचा नायनाट करण्याचा आमचा उद्देश आहे असें इतर देशांतल्या कांहीं दुष्ट, हेवेखोर जिभा लवलवत आहेत; पण आमचा तसा मुळींच उद्देश नाहीं.—होय, आम्हीं सर्वत्र शुद्धीकरण चालवलं आहे, ही गोष्ट खरी आहे. पण अशा शुद्धीकरणानंतरच राष्ट्राचा पुनर्जन्म होत असतो,—राष्ट्राला नवजीवन प्राप्त होत असतं; साऱ्या जगात उच्चतम शास्त्र संपादन करण्याचा आमचा विचार आहे. तें शास्त्र म्हणजे साऱ्या जगांत कुणी कधींच न पाहिलेलं आमचं,—आमचं स्वतःचं,—आमच्या राष्ट्रीयत्वाच्या चिरंतन पायावर उभारलेलं शास्त्र. ( तो एकदम थांबतो. )

**माल्झिअस्** : ( चांचरत ) मघाशीं आपण म्हणालांत त्या शुद्धीकरणांतच माझं आतांपर्यंत जें झालं त्याचा समावेश होतो वाटतं ?—म्हणजे मला दुखवण्याचा तुमचा हेतू नव्हता तर ?

**सेनापती :** ( आपणाला बोलण्याची परवानगी मिळावी अशा हेतूनें डिक्टेटराच्या चेहऱ्याकडे पाहून; हंसत हंसत ) होय; 'प्रोफेसर माल्झिअस्' साहेब, तो शुद्धीकरणाचाच एक भाग होता. डिक्टेटरसाहेबांचा शब्द आतां मिळाला; आतां तो भाग खलास.

**माल्झिअस् :** माझ्या नाहीं ध्यानांत आलं—

**सेनापती :** ( हळूहळू, विचारपूर्वक बोलत ) त्यांत कठीण कांहीं नाहीं. शास्त्रीय जगतात तुम्ही एक थोर पुरुष समजले जातां, तुम्हाला लामार्क् पदक आणि नॉबेल पारितोषक मिळालं आहे; ही तुम्ही केलेली राज्याची सेवा होय. पण कशामुळें कुणाला ठाऊक, तुमच्या डोक्यांत भलतेच राजकीय विचार खेळूं लागले. असे विचार डोक्यांत खेळणं हा राज्याशी द्रोह होय. म्हणूनच तुम्ही योग्य मार्गावर यावं म्हणून डिक्टेटरसाहेबांच्या हुकूमान्वयें तुम्हाला विशिष्ट काळ विशिष्ट शिक्षणक्रमाचे धडे घ्यावे लागले. पण आतां मला वाटतं, तो काळ संपला.

**माल्झिअस् :** म्हणजे इतःपर तुम्हाला त्या तरुणांचीं नांवं समजून घ्यायची इच्छा नाहीं ?—त्यांचे पत्ते तुम्हाला नकोत ?

( बंदूकीची फैर झडल्याचा सूक्ष्म आवाज येतो. डिक्टेटर प्रश्नार्थक मुद्रा करून सेनापतीकडे पहातो. सेनापती नुसत्या आपल्या हातातल्या घड्याळाकडे पहातो, आणि समाधानपूर्वक मान हालवतो. )

**सेनापती :** (माल्झिअस्नां ) त्यांच्या नांवांना नी पत्त्यांना आतां कांहींच महत्व उरलेलं नाहीं. त्या देशद्रोही कटवाल्यांना गिरफदार करून केव्हांच यमसदनाला पाठविण्यांत आलं आहे. आतां देशांत कसलाच विरोध उरलेला नाहीं.

**माल्झिअस्** : ( यांत्रिक बाहुली बोलावी तशा आवाजांत ) आतां विरोध उरलेला नाहीं ?—नाहीं ? आं ?

**सेनापती** : त्यांच्याकडून जो पुरावा उपलब्ध झाला त्यांत तुमचं नांवसुद्धां आलं नाहीं.

**माल्झिअस्** : नांवसुद्धां आलं नाहीं ?....हां....असेल.

**सेनापती** : आतां आपण पुढल्या कार्याविषयीं बोलूं. मी अगदीं प्रांजळपणें बोलतो, हं. आमच्या नव्या राज्याचा विशेष हाच, कीं तें आपल्या नागरिकांशीं अगदीं प्रांजळपणें वागतं.

**डिक्टेटर** : ( एखाद्या स्वप्नाळू माणसासारखा आतांपर्यंतचा संवाद तो ऐकत असतो. ) खरी गोष्ट आहे ही.

**सेनापती** : त्याचं असं आहे, कीं परदेशांत प्रोफेसर माल्झिअस-संबंधी चळवळ चालू आहे. म्हणजे त्याची आम्हीं पर्वा करतो असं नव्हे. पण ते तुमच्या ओळखीचे गृहस्थ—ते प्रोफेसर बोनार्ड् आणि दुसरे कांहीं इतर लोक यांनीं आपला कांहीं एक संबंध नसतांना कांहींतरी अव्यापारेषु व्यापार सुरू केला आहे.

**माल्झिअस्** : ( आश्चर्यानें ) माझ्यासंबंधी ते चवकशी करताहेत ?—असेल—असेल; कारण माझे रक्तपेशीवरचे प्रयोग जवळ जवळ यशस्वी—

**डिक्टेटर** : ( मध्येंच त्यांना अडवून ) कोणत्याही परदेशी चळवळीमुळें आम्हीं आमच्या कृतनिश्चयापासून ढळणार नाहीं. पण आमचें राष्ट्र हें राष्ट्रीयत्वांत आणि वीर्यशालित्वांत सर्वश्रेष्ठ आहे हें आम्हीं दाखवून दिलेंच आहे; शास्त्र आणि संस्कृतीच्या आघाडीवराहि

तें पहिलें आहे हें दाखवून देण्याचा आमचा अढळ निश्चय आहे. प्रोफेसर माल्झिअस्, तुम्हाला याकरतांच इथं आणण्यांत आलं आहे.

**माल्झिअस्** : ( थरथरत, डोळे फाडून पहात ) माझ्या नाहीं ध्यानांत आलं....माझी प्रयोगशाळा पुन्हां तुम्ही माझ्या ताब्यात देणार ?

**डिक्टेटर** : होय.

**माल्झिअस्** : माझी विद्यापीठातली जागाही मला परत मिळणार ?—माझं संशोधन ?

**डिक्टेटर** : आमच्या राज्यकारभाराचा हा तर मुख्य उद्देश आहे कीं विज्ञानक्षेत्रांतल्या आमच्या मातृभूमिच्या राज्यनिष्ठ सुपुत्रांना शक्य तितकं उत्तेजन द्यायचं.

**माल्झिअस्** : पहिली गोष्ट म्हणजे मला कुठल्यातरी चांगल्याशा हॉस्पिटलांत गेलं पाहिजे. माझ्या नाडीचे ठोके अगदीच मंद झाले आहेत. अर्थात्, ते मूळपदावर यायला फारसा वेळ लागणार नाहीं. ( त्यांच्या आवाजात एकप्रकारची अधीरता व्यक्त होते. त्यांचे डोळे लकलकत आहेत. ) आणि—आणि माझ्या टिप्पणवह्या, मला वाटतं, जाळून टाकण्यांत आल्या आहेत.—अगदींच मूर्खपणा झाला तो;—पण त्यांत कांहीं नाहीं मोठसं. मी पुन्हां पहिल्यापासून सुरू करूं शकतो. माझी स्मरणशक्ती चांगली आहे.—चांगली म्हणजे अगदी चांगलीच आहे. एकून एक सारे सिद्धांत माझ्या डोक्यांत आहेत, बरं का. ( डोक्याला बोट लावून ) हो, मात्र मला मदत करायला चांगले सहाय्यक पाहिजेत. आमचा तो छोटा ग्रेगॉपुलॉस—फार चांगला होता काम करणारा—

**सेनापती** : ( कठोरपणें ) त्या माणसाला ठार करण्यांत आलं आहे. त्याला तुम्ही जितक्या लवकर विसरून जाल तितकं बरं.—

**माल्झिअस्** : अरेच्या !—बरं, बरं—पण मला दुसरा कुणी मिळेल ना ?—हे पहा, हे प्रयोग फार महत्वाचे आहेत. मला सहाय्य करायला माझ्या हाताखालीं कांहीं तरुण, हुषार विद्यार्थी पाहिजेतच. ते सर्वच ठार झाले असतील, असं मला नाहीं वाटत. आस्वल,—मला बडा आस्वल म्हणत ते—( घाबरटपणें, पण किंचित् हंसून ) आणि या बड्या आस्वलाला नेहमीं अगदी वेंचक विद्यार्थी मिळत पहा ! ते मला महाऋक्ष—बडा आस्वल म्हणत, बरं का ! ( ते एकदम थांबतात; आणि समोर शून्य दृष्टीनें पाहूं लागतात. ) तुम्ही माझी थट्टा तर करीत नाहीं ? ( त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागतात. ते धाडकन् जमिनीवर कोसळतात. )

[ एक अंमलदार आंत येतो. नेहेमीचा सलाम ठोकून डिक्टेटराशीं आंतल्या आवाजांत कांहीं कुजबूज करतो. डिक्टेटर उठतो आणि शिस्तींत दरवाजाकडे जाऊं लागतो. मेज, खुर्ची वगैरे वस्तू सुरुवातीला ज्यांनीं आणून ठेवल्या होत्या, ते लोक ताबडतोब त्या पुन्हां उचलण्याकरतां पुढें होतात. ]

**डिक्टेटर**:—( मागे वळून ) इथंच असूं द्या तें सर्व. मी पुन्हां परत येणार आहे.

( तो जातो. कागदपत्र उचलणाऱ्या अंमलदाराने पुन्हां ते होते तिथे ठेवले आहेत. सैनिकाने उचललेली दौत पुन्हां जागच्या जागीं ठेवली आहे. डिक्टेटराच्या शरीररक्षकदलाबरोबर ते सैनिकहि बाहेर निघून जातात. )

**सेनापती** : ( त्या मेजाच्या एका कोपऱ्यावर बसतो. एखाद्या अदृष्टपूर्व, चमत्कारिक जनावराला पहावें त्याप्रमाणें आपल्या एकाभिंगी चष्म्यांतून माल्झिअस्नां न्याहाळतो. ) आम्ही तुमची थट्टा करतो आहोंत

किंवा काय असा जो अयोग्य प्रश्न तुम्ही आतां विचारलात, त्याची डिक्टेटरसाहेबांनीं एकवेळ तुम्हांला क्षमा केली आहे. त्यांना माहित आहे कीं तुम्ही गडबडून गेल्यामुळें तुमचं मन ठिकाणावर नाहीं.

**माल्झिअस्** : ( हुन्दके देत ) हो....खरं आहे तें. ( चष्मा काढून आपल्या फाटक्या मळकट रुमालाच्या चिंधीनें तो पुसतात.)

**सेनापती** : ( एक प्रकारच्या कृत्रिम मनमोकळेपणानें ) छे, छे, असं काय करतां ? आमच्या नॅशनल ॲकेडेमीचे भावी अध्यक्ष असे रडायला लागले तर कसं होईल ! छे, छे, हें नाहीं चालणार, बुवा. या वेळेला तुमचा जर कुणी फोटो काढला, आणि तो वृत्तपत्रांतून छापून आला; तर कसं बरं दिसेल ?

**माल्झिअस्** : ( चटकन् ) ॲकेडेमीचा अध्यक्ष ? छे, छे, मी कधींच होऊं शकणार नाहीं. ॲकेडेमीच्या अध्यक्षांनां वेळोवेळीं सार्वजनिक प्रसंगीं भाषणं करावी लागतात; त्यांना दैनंदिन कारभाराचा गाडा हांकावा लागतो. मला कसं ते जमणार ? मी शास्त्रज्ञ आहे. मी अध्यापक आहे. प्रयोगशाळेत संशोधन करावं आणि विद्यार्थ्यांना शिकवावं, हें माझं काम.

**सेनापती** : ( त्याच मनमोकळेपणानें,—पण त्यांच्याकडे टक लावून पहात.) ते कांहीं असो, पण हें कर्तव्य तुम्हाला टाळतां येईल असं मला वाटत नाहीं. तुम्हाला जेव्हां अध्यक्षस्थानी नेमण्यांत येईल, तेव्हां मोठा समारंभ करण्यांत येईल. स्वतः डिक्टेटरसाहेबांची स्वारी त्या समारंभाचं अध्यक्षस्थान स्वीकारील. त्या प्रसंगी, 'आपल्या राष्ट्रीय विज्ञानाचं अतुल वैभव' या विषयावर तुम्हाला भाषण करावं लागेल. आमच्या

शेजारची राष्ट्रं वेळीं अवेळीं आमच्यावर जी क्षुद्र, हवेखोर टीका करतात, तिला तुमचं भाषण म्हणजे एक चांगलंच खरमरीत उत्तर होईल. ( माल्झिअस् कांहींतरी बोलून त्याला अडवणार तोंच किंचित् घाईने ) अं—हं. त्या भाषणाची तुम्हाला काळजी नको; तें व्यवास्थित तयार केलं जाईल. तुम्हाला फक्त ते वाचून दाखवावं लागेल. आमचे डिक्टेटरसाहेब प्रत्येक गोष्टीचा बारकाईनें विचार करून ठेवतात.

**माल्झिअस्** : बरं आहे, तें ठीक; पण तेवढं झाल्याबरोबर पुन्हा मी आपल्या प्रयोगशाळेत कामाला जाऊं शकेन ना ?

**सेनापती** : ( स्मित करीत ) त्याचा काय एवढा विचार करतां ? मी आपला एक साधा शिपाई-गडी आहे. तुमचे ते प्रयोग आणि तें काम मला कांहीं कळत नाहीं. पण तुम्हाला काम पाहिजे तर पुष्कळ मिळेल. त्याची काळजी नको.

**माल्झिअस्** : ( उत्सुकतेनें ) जितकं अधिक काम मिळेल तितकं चांगलं. आणखी दहा वर्षं तरी मला काम करतां येईल असं वाटतं. ( ते स्मित करीत असतां त्यांचं तोंड उघडतें. सेनापतीच्या चेहेऱ्यावर आश्चर्याची छटा दिसते. )

**सेनापती** : ( त्यांच्या जवळ जाऊन त्यांचं तोंड आपल्या दोन हातांत धरतो. एका हातानें त्यांचे ओठ उघडीत ) तुमच्या दांतांवर ताबडतोब उपाययोजना केली पाहीजे. नवे दांत ताबडतोब बसवले पाहिजेत. ( जवळ जवळ स्वतःशींच ) आणि तुम्हाला कुठें तरी विश्रांती-साठीं पाठवलं पाहिजे. वृत्तपत्रांत देण्याकरतां तुमचे फोटो घेण्यापूर्वी एवढ्या गोष्टी झाल्याच पाहिजेत. दुधाचा आहारही यांनां कांहीं दिवस

दिला पाहिजे....प्रोफेसर माल्झिअस्, तुम्हाला अजून तितकसं बरं वाटत नाहीं ?

**माल्झिअस्** : छे, छे, मी अगदीं सुखांत आहे. मला इथं फारच चांगल्या रीतीनं वागवण्यांत आलं आहे....मूळ शेतकरी रक्ताचा आहे मी. तसा माझा पिंड मजबूत आहे.

**सेनापती** : वः, छान ! ( तो कांहीं क्षण थांबतो. नंतर अधिकारी आवाजांत ) प्रोफेसर माल्झिअस्, एक गोष्ट मात्र मी धरून चालतों—

**माल्झिअस्** : काय ?....माफ करा हं, माझ्या नाहीं लक्षांत आलं....माझ्या डोक्यांत दुसरेच कांहीं विचार चालले होते.

**सेनापती** : प्रोफेसर माल्झिअस्, तुम्हाला—अं—तुम्हाला योग्य मार्गावर आणून आम्ही राज्याच्या सेवेला लावलं. मी असं धरून चालतो कीं तुम्ही पुन्हां माग फिरणार नाहीं,—तुमचं हें हृदयपरिवर्तन आतां कायमचं, असं धरून चालायला आम्हाला हरकत नाहीं ना ? साहजिकच, अजूनही कांहीं दिवस तुमच्यावर नजर ठेवण्यांत येईलच; तरी पण तुमच्या हातून इतःपर कसल्याही चुका होणार नाहींत याची तुम्ही काळजी घेतली पाहिजे.

**माल्झिअस्** : ( अधीरपणें ) मी शास्त्रज्ञ आहे. मला राजकारणाशीं करायचंय काय ? मी राज्यनिष्ठेची शपथ घ्यावी एवढीच तुमची इच्छा असेल तर तुम्हाला हव्या तितक्या राज्यनिष्ठेच्या शपथा घ्यायला मी तयार आहे.

**सेनापती** : तुमची ही मनोभूमिका पाहून मला खरोखरच आनंद वाटतो. ( त्याच्याकडे जिज्ञासू नजरेनें पहात ) यापूर्वी झालेल्या

तुमच्या आमच्या गांठीभेटींत कांहीं वेळां बरेच दुःखदायक प्रसंग येऊन गेले त्याबद्दल मी दिलगीर आहे. तुमचा माझ्यावर कसल्याच प्रकारचा रोष नसेल, अशी मला आशा आहे.

**माल्झिअस्** : अहो, त्यांत मी रोष कसला करणार ? त्या वेळेला तुम्हाला जें करा म्हणून सांगण्यांत आलं तें तुम्ही केलंत. आतां दुसरं कांहीं करा म्हणून सांगण्यांत आल्याबरोबर तें तुम्ही करतां आहांत. बस्. दुसरं काय ?

**सेनापती** : ( किंचित् गुर्मींत ) छे, छे, ही गोष्ट तुम्हाला वाटते तितकी साधी नाहीं. (प्रोफेसरांकडे ोखून पहात) वाजवीपेक्षां फाजील ताठ पाठीचा कणा असलेल्यापैकींच तुम्हीहि एक आहांत असं मी शपथेपर सांगूं शकलो असतो ! ( कांहीं क्षण थांबतो. ) जाऊं द्या. मला वाटतं, प्रत्येकाची एकदां केव्हांतरी वेळ येतेच; तेव्हां त्याच्या पाठीचा कणा आपोआपच दुमडतो !....आतां थोड्याच वेळांत डिक्टेटर-साहेबांचा शेवटचा हुकूम तुम्हाला मिळेल. आज रात्रीं तुम्हाला सरकारी रेडिओवरून भाषण करावं लागेल. भाषण करणं तुम्हांला मुळींच कठीण जाणार नाहीं; भाषण लिहून तयार आहे. त्याचा एक परिणाम असा होईल, कीं आमच्या तावडींतून सटकलेल्या त्या बोनार्डनें साऱ्या जगभर जी आरडाओरड चालविली आहे, आणि ब्रिटिश पार्लमेंटमध्यें जे प्रश्न उपस्थित करण्यांत आले आहेत त्या सर्वांना एकदां कायमचे उत्तर मिळेल. नंतर कांही दिवस कुठल्या तरी समुद्राकांठच्या हवेच्या ठिकाणीं थोडी विश्रांति घेतली, नी एखाद्या कुशल दंतवैद्याकडून तेवढे पडलेले दांत बसवून घेतले, की आमच्या नॅशनल ॲकेडेमीचे अध्यक्ष-

साहेब आपलीं नवीं कर्तव्यं पार पाडायला चांगलेच ‘ तय्यार ’ होतील. अध्यक्षसाहेब, आमच्या अभिनंदनाचा स्वीकार करा. आपली पुन्हां भेट होईल तेव्हां याहीपेक्षां कितीतरी आनंददायक वातावरणांत ती होईल अशी दृढ आशा आहे. ( अगदीं कमरेपासून खालीं लवतो; तरी पण एखाद्या वाघाची क्रूरता त्याच्या हालचालींत अजूनही आहे. नंतर, एकदम तो ‘हुश्शार’ पवित्र्यांत उभा राहतो. माल्झिअस्‌हि ‘हुश्शार’ होतात; कारण त्यांच्याहि कानावर बाहेर उच्चारला गेलेला नेहमीचा हुकूम पडला आहे. डिक्टेटर आंत प्रवेश करतो. त्याच्या मागून त्याचे आठ शरीरसंरक्षक येतात. )

**डिक्टेटर** : ठरलं ना ? छान ! प्रोफेसर ग्रेगॉर माल्झिअस्‌, नव्या रियासतीच्या सेवाक्षेत्रांत तुम्ही आतां पाऊल टाकणार. मी तुमचं मनःपूर्वक स्वागत करतो. आपल्या डोक्यांतील चुकीची विचारसरणी तुम्ही आतां झुगारून दिली आहे. आम्हा सर्वांच्या एकमेव भवितव्याचे तुम्ही आतां भागीदार झालां आहांत.

**माल्झिअस्‌** : होय. माझ्या कामाला आतां मी लागूं शकेन.

**डिक्टेटर** : ( चेहऱ्यावर किंचित्‌ नापसंतीची छटा येऊन जाते. ) तुम्हीं आपलं अमोल संशोधन चालू ठेवूं शकाल इतकंच नव्हे, तर आपल्या राष्ट्रध्येयांच्या प्रसारालाही हातभार लावूं शकाल,—खरं बोलायचं म्हणजे तुमच्या अनेक कर्तव्यापैकीं तें एक महत्वाचं कर्तव्य होऊन बसेल. जगाचं कल्याण व्हावं म्हणून साऱ्या जगावर आमच्या नवस्फूर्तिशाली राष्ट्राचीच सत्ता झाली पाहिजे. आमच्या हृदयांत नवस्फूर्तीची जी ज्योत उजळली आहे ती इतर राष्ट्रांच्या नागरिकांत

असणंच शक्य नाही. जगाच्या कोनाकोपऱ्यांतून आमच्या संस्कृतीचा प्रसार झाला पाहिजे. दैवाचाच असा आदेश आहे. नॅशनल ॲकेडेमीचे अध्यक्ष म्हणून तुमचं जे पहिलंच भाषण होणार त्याचा विषयच मुळीं हा आहे.

**माल्झिअस्** : ( अगदीं मंद आवाजांत ) पण मी लढवय्या नाहीं. मी एक जीवरसायनशास्त्रज्ञ आहे. आपण बोलतां आहां त्या विषयांची मला कांहींच माहिती नाहीं. मला त्याचा काहींच अनुभव नाहीं.

**डिक्टेटर** : ( मान हालवीत ) विज्ञानक्षेत्रांत तुम्ही एक प्रथितयश गृहस्थ आहांत. आमच्या महिलांनी वीरमाता झालं पाहिजे,—आमच्या पुरुषांनी प्रजासत्ताक राज्यव्यवस्था, लोकशाही राज्यकारभार इत्यादि खुळं डोक्यांतून काढून टाकून, सत्ता गाजवण्याकरतांच ज्यांचा जन्म झाला आहे अशा दैवदत्त नेत्यांच्या आज्ञा शिरसावंद्य मानल्या पाहिजेत,—वगैरे वगैरे गोष्टी तुमच्या सारख्या शास्त्रज्ञांना सशास्त्र सिद्ध करून दाखवाव्या लागतील. शास्त्रनियमांच्या आधारानें तुम्हाला बिनतोड सिद्ध केलं पाहिजे, कीं कांहीं विशिष्ट वंशाचे लोकच,—आपल्याच वंशांचे लोक म्हणाना,—जगावर राज्य करण्याकरतां भवितव्यतेनें निवडून काढले आहेत. संग्रामशीलता हा आमच्या दिव्य परंपरेचा एक महत्वाचा भाग आहे; आणि आमची परंपरा ही अशी आहे म्हणूनच साऱ्या जगावर आमचं प्रभुत्व व्हावं असा दैवी आदेश आहे, हीही गोष्ट तुम्हाला शास्त्रीय सत्यांत बसवली पाहिजे.

**माल्झिअस्** : पण—हें असं नाहीं केलं जात. (त्यांच्याकडे सर्वजण टवकारून पहातात.) म्हणजे, मला हेच सांगायचं आहे, कीं आमच्या

प्रयोगशाळेत आम्हीं वेगवेगळ्या घटनांचं सूक्ष्मपणें निरीक्षण करीत रहातो, आणि त्यांच्या विकासाची वाट पहातो. कित्येक दिवसच्या दिवस, महिने, कां–केव्हां केव्हां वर्षानुवर्ष वाट पहावी लागते. ही शास्त्रीय पद्धतच मुळीं अशी आहे;–फार, फार वाट पहावी लागते. आणि नंतर, इतकंही करून आपला सिद्ध करूं घातलेला सिद्धांत जर सिद्ध झाला नाहीं, तर क्षणाचाही विचार न करतां तो सिद्धांत कुचकामी म्हणून टाकून द्यावा लागतो. शास्त्रीय पद्धत ही अशी आहे. मला कदाचित् नीटसं सांगतां आलं नसेल, पण मी तरी काय करूं ? मी आहे एक जीवरसायनशास्त्रज्ञ. विशिष्ट वंशाच्या लोकांत विशिष्ट सद्गुण कसे शोधून काढावे आणि इतर लोकांत ते नाहींत, हें कसं दाखवून द्यावं यासंबंधी मला माहिती नाहीं. संग्रामशीलता नी युद्धपिपासा याबाबत मी काय सिद्ध करूं ?–तीं माणसांचे मुडदे पाडतात एवढं फार तर मी सिद्ध करूं शकेन. याखेरीज दुसरंच कांहीं तरी मी सिद्ध करून दाखवलं तर सारं जग मला हंसेल.

**डिक्टेटर** : पण आपल्या राष्ट्रांत तुम्हाला कुणीच हंसणार नाहीं.

**माल्झिअस्** : ( कपाळावर आठ्या चढवून ) पण माझ्या हातून चूक झाल्यावरही जर ते मला हंसणार नाहींत, तर मग शास्त्र कुठं राह्यलं ? ( थोडा वेळ थांबून, जीव तोडून बोलूं लागतात. ) गैरसमज करून घेऊं नका. आणखी दहा वर्षं तरी मी चांगलं काम करूं शकेन. माझ्या प्रयोगशाळेकडे केव्हां जाईन असं मला झालं आहे. तिथं–तिथं माझे तरुण विद्यार्थी आहेत, आणि त्यांना शिकवायचं म्हणजे–म्हणजे–( त्यांना भोवळ आल्यासारखी वाटते. पुन्हां थांबून )–माफ करा.

मला इथं जें अन्न मिळतं त्यांत सत्व फार कमी असतं. माझ्या नाडीचे ठोके अगदींच मंद झाले आहेत.—फार अशक्तता आली आहे. त्यामुळं माझ्या विद्यार्थ्यांसंबंधी बोलूं लागलों, कीं माझ्या डोळ्यासमोरून त्यांचे तरुण चेहरे एकामागून एक जाऊं लागतात. माझ्या वर्गांतले ते सर्व—सर्व चेहरे मला दिसूं लागतात. जगाच्या दूरदूरच्या भागांतून ते येत. माझा तो इंग्लिश विद्यार्थी विल्यम्स—गेल्या महायुद्धांत मारला गेला. आणि छोटा ग्रेगॉपुलॉस (सेनापतीच्या चेहऱ्यावर नापसंतीची छटा दिसते, पण माल्झिअस्‌चें तिकडे लक्षच नाहीं.) काय भेदक डोळे होते त्याचे. त्याशिवाय आणखी किती तरी विद्यार्थी मला आठवतात—हिंदुस्थानी, इराणी, चिनी, दक्षिण आफ्रिकेंतले.—माझ्याकडे येत, शिकत आणि आपापल्या देशांत निघून जात. त्यांच्यापैकीं कांहीं मरून गेले.—त्यांत कांहीं मोठसं नाहीं. पण माझ्या हाताखालीं विद्यार्थी जोपर्यंत शिकत असतात, तोंपर्यंत—त्यानां सत्य,—निर्भेळ सत्यच मी देणार.—नाहींतर शास्त्राची परंपरा कशी राहील ?....मी म्हणतो, शास्त्रच कसं राहील ?

**डिक्टेटर** : ( तीक्ष्ण नजरेनें सेनापतीकडे पहात ) प्रोफेसर माल्झिअस्‌नां सर्व कांहीं सांगितलं आहे, अशी माझी कल्पना होती.

**माल्झिअस्** : हो—हो सांगितलं आहे ना. तुम्ही सांगाल त्या कागदांवर मी सह्या करतो. तुमच्या त्या राजकारणाशीं मला कांहीं एक कर्तव्य नाहीं, याची मी तुम्हाला अगदीं खात्री देतो.—कल्पना करा, माझ्यासारखा माणूस करणार काय राजकारणांत ?—ही राज्य-पद्धती असो, नाहीं तर ती राज्यपद्धती असो—कसली का राज्य-

पद्धती असेना,––मला काय करायचंय् ?––तंबाखूची मला फार आठवण होते. किती दिवसांत मी तंबाखू ओढलेला नाहीं. खरंच कुणी मला माझा पाईप् आणून देईल तर उपकार होतील. हो, पण––मात्र एक गोष्ट सांगतों. शास्त्रज्ञ म्हणून जगायचं असेल, तर खोटं बोलून चालणार नाहीं. ( किंचित् थांबून, सेनापतीच्या आणि डिक्टेटरांच्या चेहेऱ्याकडे पहातात. नंतर मागें उभे असलेल्या शरीररक्षकांच्या दगडी, निर्विकार चेहेऱ्याकडे पहातात. अगदीं पडलेल्या आवाजांत ) समजा, मी नाहीं खोटं बोललों तर काय होईल ?

**सेनापती** : ( कठोर चेहेरा करून बोलतो. डिक्टेटर तोंड फिरवतो ) मग––मग प्रोफेसर माल्झिअस्, आपल्या जुन्या मुलाखती पुन्हां सुरू कराव्या लागतील.

**माल्झिअस्** : ( भोळसटपणें ) म्हणजे, मग–मला–पुन्हां मारपीट सुरू होईल ?

**सेनापती** : ( खांदे उडवून ) तुम्हाला मार्गावर आणण्याकरितां अंमलांत आणलेली उपाययोजना पुरेशी झालेली दिसत नाहीं, पण–कदाचित् आणखी कांहीं काळ गेला–

**माल्झिअस्** : ( थकलेल्या आवाजांत ) मला नाहीं वाटत त्याची पुन्हां जरूर पडेल. मला आतां कुणीच मारूं शकणार नाहीं. ( शून्य दृष्टीने आजूबाजूला पहातात. खांदे ताठ करून स्पष्ट खणखणीत आवाजात बोलूं लागतात ) तुमच्या सर्व अंमलदाराना आंत बोलवा. कांहीं कागदावर मला सह्या करायच्या आहेत ना ? त्या सर्वांना साक्ष ठेऊन मी सह्या करतो.

**सेनापती :** ( आश्चर्यानें ) म्हणजे–म्हणजे–( संशयित नजरेनें डिक्टेटराकडे पहातो. )

**डिक्टेटर :** ( नेपोलियनसारख्या दिसणाऱ्या त्याच्या कृश चेहऱ्यावर समाधानी दिसते ) प्रोफेसर ग्रेगॉर, सर्वजण आजबाजूला असले, म्हणजे तुम्हाला खूपच बरं वाटेल. ( त्यांच्या जवळ जाऊन त्यांच्या हाताला स्पर्श करीत ) तुम्ही कबूल झालांत, हें पाहून खरंच मला फार फार आनंद होतो.

**माल्झिअस् :** म्हणजे वः! कबूल झालंच पाहिजे.—निदान तुमच्या पुढं तरी—तुम्ही डिक्टेटर—सर्वाधिकारी आहांत ना? आणि पुन्हां असं आहे–कीं मी जर नाहीं कबूल झालों, तर–तर मला पुन्हां मारपीट करण्यांत येईल. आणि आतां तुमच्या लक्षांत येईलच, कीं मला पुन्हां कुणी–कुणीच मारू शकणार नाहीं. ( ते थांबतात. त्यांचा श्वास जोरानें चालला आहे. )

**डिक्टेटर :** तुमचे हे शब्द ऐकून मला खरंच आनंद होतो.—खरोखरच मी खुष आहे. ( एक अंमलदार बाहेर जातो त्यानंतर वरील संभाषण चालूं असतां दुसरे अनेक अंमलदार आणि गणवेश घातलेले लोक त्या खोलींत आले आहेत; आणि खोली भरून गेली आहे. डिक्टेटर त्यांच्याकडे वळून बोलूं लागतो. ) लामार्क् पदक, नॉबेल परितोषक इत्यादि जागतिक मान मिळवणारे, आपल्या राष्ट्राचे सर्वश्रेष्ठ शास्त्रज्ञ प्रोफेसर गेग्रॉर माल्झिअस् हे आजपासून आपल्या राज्याच्या सेवेला वाहून घेत आहेत. आपल्या नव्या नॅशनल ॲकॅडेमीचे पहिले

अध्यक्ष म्हणून त्यांचें स्वागत करावयाला आज आपण सर्व इथं जमलों आहोंत.

( नम्रपणें सर्वजण टाळ्या वाजवतात )

**सेनापती** : ( खालच्या आवाजांत ) उचला ती लेखणी, प्रोफेसर माल्झिअस्; दौत तिथं आहेच.

**माल्झिअस्** : तिच्यांत भरपूर शाई आहे ना ?

**सेनापती** : हवी तितकी आहे. करा आतां सही.

**डिक्टेटर** : आमच्या नव्या रियासतीच्या वतीनें मी आपलं स्वागत करतो.

**माल्झिअस्** : ( दौत जवळ घेऊन, डिक्टेटराकडे वळतात ) राज्य—नवी रियासत—खरं आहे. पण आमच्या शास्त्राशी तुमच्या राज्यांचा नी रियासतीचा कांहीं एक संबंध नाहीं. तूं—तूं एक क्षुद्र कवडीकिंमत माणूस आहेस !

( पुढें येऊन त्याना कुणी अडवायच्या अगोदरच ते दौत हस्तगत करतात, आणि त्यांतली सर्व शाई डिक्टेटराच्या थोबाडावर भिरकावतात.

एकदम सर्वजण त्यांच्यावर तुटून पडतात. सेनापती माल्झिअस्वर चित्त्यासारखी झडप घालतोः आणि एक ठोसा मारून त्यांना जमिनीवर उडवतो. डिक्टेटर मात्र निर्विकार चेहरा ठेवून ताठ उभा आहे. त्याच्या चेहऱ्यावरून शाई ठिबकते आहे. त्याच्या बोलदार गणवेषावरूनही शाईचे ओहोळ वहाताहेत, पण ते पुसून टाकण्याकरता बोटही न हालवतां डिक्टेटर ताठ उभा आहे. )

**डिक्टेटर** : बाहेर न्या त्या माणसाला, आणि ताबडतोब गोळी घाला. खेंचा, एकदम !

[ अम्मलदार आणि सैनिक माल्झिअस्नां धरतात. बकोटीला धरून त्यांना त्यांच्या पायावर सैनिक उभे करतात. कित्येक त्यांना लाथा हाणतात. त्यांचा चष्मा खालीं पडतो. त्यावर एक अम्मलदार जोरानें बुटाची टांच दाबतो. माल्झि-

असून्ना पुन्हां खाली आपटतात, पुन्हां उभे करतात, आणि खेंचाखेंची करीत बाहेर घेऊन जातात. ]

**सेनापती** : सरकारच्या शरीराला त्यानं कुठं दुखापत केली कीं काय ?

**डिक्टेटर** : त्याकडे लक्ष द्यायचं कांहींच कारण नाहीं.

( पुढले दिवे क्षणाक्षणाला अंधुक होत आहेत. दरम्यान आपल्या हातरुमालानें सेनापती डिक्टेटराच्या तोंडावरल्या शाईच्या धारा पुसून काढीत आहे. मागले दिवे अस्पष्टपणें प्रकाशूं लागतात. त्या प्रकाशांत मागल्या बाजूला एक दगडी भिंत आणि जवळच एक खांब दिसतो.

माल्झिअसला फरफरत ओढीत घाईघाईनें सैनिक येतात. )

**माल्झिअस्** : ( मोठ्यानें हंसत, स्वतःशी बोलतात. ) शाईनें बरबटलेला शाळकरी पोर कुठला !—माथं भडकलेला शाळेंतला पोर ! असल्या चेहेऱ्याच्या या माणसानं राष्ट्रावर आणि त्यांतल्या तरुण पिढीवर सत्ता गाजवायची म्हणजे काय !—ते कांहीं असो, पण सत्याला मरण नाहीं—सत्याला कुणीही मारूं शकणार नाहीं !

( सैनिक माल्झिअस्ना खांबाला जखडून बांधीत आहेत. मागली दगडी भिंत प्रकाशांत झगझगू लागते, आणि भिंतीवर जिकडे तिकडे चेहेरेच चेहेरे दिसूं लागतात. ते सर्व चेहेरे मृत माणसांचें आहेत. ग्रेगॉपुलास, एल्सा, मॅक्स, ॲन्टन, विसॉट्स्की, एलरमन यांचे चेहेरे तर आहेतच; पण आणखीही इतरांचे पुष्कळ आहेत. ते चेहरे इकडून तिकडे फिरतात, एकमेकांकडे पहातात--आणि मोठमोठ्यानें जयजयकार करतात.

**आवाज**—माल्झिअस् !

महाऋक्ष माल्झिअस् !

बडा आस्वल !

विद्यार्थी निवडावें माल्झिअस्नींच !

उत्तमांतले उत्तम तरुण !

—आणि उत्तमांतल्या उत्तम तरुणीही !

माल्झिअस्—बडा आस्वल !

सत्याला मरण नाहीं !

सत्याला कुणीही मारूं शकणार नाहीं !

माल्झिअस्चा विजय असो !

माल्झिअस् चिरायु होवोत !

माल्झिअस्, आमचे माल्झिअस् ! !

**एक अंमलदार** : ( रंगभूमीवर दिसत नसलेल्या बंदूकवाल्या सैनिकांना एका दमांत हुकूम सोडतो ) हुश्शार ! धरा नेम ! झाडा ! !

[ फैर झाडल्याचा आवाज येतो. मागले दिवे एकदम जातात. बोलणारे आवाज थांबतात.

पुढले दिवे अंधुक अंधुक दिसूं लागतात. ]

**सेनापती** : ( अजूनही डिक्टेटराच्या कपड्यावरची शाई हातरुमालानें पुशीत आहे. मोठ्ठी कोटी करण्याच्या ऐटींत— ) बंदुकीची गोळी जर कुणाला मारूं शकत असेल; तर तो पहा तिकडे राज्याचा एक शत्रू मरून पडला !

**डिक्टेटर** : पण—पण ( त्याचा आवाज खूप वर चढतो आणि कर्कश किंकाळीसारखा वाटतो. सेनापतीचा हात बाजूला ढकलून ) —पण बंदुकीची गोळी मारूं शकत नसली तर ?

[ मागले दिवे एकदम झगझगीत पेटतात. एकमेकांकडे पहात ते दोघे उभे आहेत. ]

# वीणा प्रकाशन

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (१) | समरभूमि | प्रो. फडके | ... | १-८-० |
| (२) | स्वैरविचार | श्री. माडखोलकर | ... | १-८-० |
| (३) | दोन मनें | ,, खांडेकर | ... | २-०-० |
| (४) | कांता | ,, माडखोलकर | ... | २-०-० |
| (५) | आविष्कार | ,, गीता साने | ... | १-८-० |
| (६) | हेमलता | ,, द्वा. वा. घाटे | ... | १-०-० |
| (७) | पांढरे ढग | ,, खांडेकर | ... | २-०-० |
| (८) | निष्कलंक | ,, कु. कमल दिक्षीत | ... | १-४-० |
| (९) | विशाल जीवन | ,, पी. वाय. देशपांडे | ... | २-०-० |
| (१०) | उषः प्रभा | ,, मांजरेकर | ... | १-४-० |
| (११) | झंझावात | ,, बोकील | ... | २-०-० |
| (१२) | पहिली लाट | ,, खांडेकर | ... | १-८-० |
| (१३) | साकी | ,, बॅा. रघुनाथ | ... | १-०-० |
| (१४) | मुखवटे | ,, माडखोलकर | ... | २-८-० |
| (१५) | काळी राणी | ,, पी. वाय. देशपांडे | ... | २-८-० |
| (१६) | स्वीकार | ,, शरश्चंद्र टोंगो | ... | १-८-० |
| (१७) | आव्हान | ,, माडखोलकर | ... | १-८-० |
| (१८) | संक्रमण | ,, वरखेडकर | ... | १-८-० |
| (१९) | एकांकिका | ,, काणेकर | ... | १-८-० |

## आगामी

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (२०) | साहित्य आणि संस्कृति | ,, स. खु. पांडे | ... | ३-० ० |
| (२१) | माझा लढा | ,, अडॉल्फ हिटलर | ... | ३-८-० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (२२) | डाक बंगला | ,, माडखोलकर | ... | २-०-० |
| (२३) | मोंगल दरबारांतील रहस्यें | ,, देशपांडे | ... | २-१२-० |
| (२४) | ? | ,, उमाकांत भेंडे | ... | २-७ ० |
| (२५) | चार भिंती | ,, खांडेकर | ... | ... |
| (२६) | नवीं मूल्यें | ,, पु. य. देशपांडे | ... | ... |
| (२७) | नवयुगाचे सहप्रवासी | ,, प्रभाकर पाध्ये | ... | ... |
| (२८) | फुलें नी कांटे | ,, खांडेकर | ... | ... |
| (२९) | दुसरी लाट | ,, ,, | .. | ... |
| (३०) | निरंकुश | प्रो. आळतेकर | ... | ... |

## आमचीं इतर प्रकाशनें

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ( १ ) | धबधब्याच्या धारेंत | प्रो पाठक | ... | १-१२-० |
| ( २ ) | पतितेचें हृदय | श्री. गडकरी | ... | १-८-० |
| ( ३ ) | कूजन ( काव्य ) | ,, हुताश | ... | १-४-० |
| ( ४ ) | शर्वरी ( काव्य ) | ,, हुताश | ... | १-८-० |
| ( ५ ) | सन १८५७ | ,, हंबर्डे | ... | ०-१२-० |
| ( ६ ) | बिगारीचा बैल | ,, ,, | ... | ०-०-० |
| ( ७ ) | गांधीवाद | ,, मराठे | ... | ०-६-० |
| ( ८ ) | समाजसत्तावाद | ,, जयवंत | ... | ०-१२-० |
| ( ९ ) | छाया | ,, टेकाडे | ... | ०-४-० |
| (१०) | कविता संग्रह | ,, बोबडे | ... | १-८-० |
| (११) | आंदोलनें | ,, प्रधान | ... | १-०-० |